मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)

सत्यमेव जयते
महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १२ वें ] सप्टेंबर १९५९ [ अंक १२



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.



अनुक्रमणिका


आपण सगळे मिळून
मुंबई राज्याची
दुसरी पंचवार्षिक योजना
यशस्वी करू.
शेतीचें उत्पादन वाढविण्यासाठीं व झपाट्यानें औद्योगीकरण करण्यासाठीं दुसऱ्या पंचवार्षिक योजनेनुसार जीं उद्दिष्टें ठरविलीं आहेत व ज्या निरनिराळ्या योजना आखल्या आहेत त्यांची यशस्वीरीत्या अम्मलबजावणी केल्यानें पूर्ण रोजगारीची सोय होईल आणि सामाजिक व आर्थिक विषमता कमी होईल. संपन्न व समृद्ध राष्ट्र उभारण्याचा हा खात्रीचा मार्ग आहे.
पूर्ण रोजगार
राष्ट्र संपन्न व समृद्ध करण्यास मुंबई राज्य हातभार लावीत आहे
मुंबई सरकारच्या प्रसिद्धि खात्यातर्फे प्रकाशित
Graphic B-81

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष बारावें
अंक बारावा

सप्टेंबर
१९५९

संपादक-मंडळ

आचार्य **स. ज. भागवत**–श्री. **हरि कृष्ण मोहनी**–प्रा. **वि. म. बेडेकर**

प्रा. **गोवर्धन पारीख** का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. **म. शं. साठे** यांनीं **दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई** येथें छापून **प्रा. वि. म. बेडेकर** यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

**पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,**
**'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९**

**२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,**
**C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( द. सातारा )**

[अनुक्रमणिका](#)

**चुकीची दुरुस्ती —**

" नवभारत " मासिकाच्या ऑगस्ट १९५९ च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या " हरिकथा-पूर्वार्ध " या लेखांत पान १८, कॉलम १ मध्यें " वारकरी कथेकरी " या परिच्छेदांत सुरवातीस– " शेवटचा तुकाराम महाराजांचा वंशज होता. " हें वाक्य चुकून पडलें आहे; तें गाळावें. प्रस्तुत प्रमादाबद्दल वाचकांनीं क्षमा करावी. तो नजरेस आणल्याबद्दल लेखक व का. संपादक श्री. बाबुराव जोशी, पंढरपूर यांचे आभारी आहेत.

त्याच अंकांत पृ. ६२ परिच्छेद ३ यांत " ४ एप्रिल १९१८ " असें चुकून छापलें गेलें आहे. ती तारीख " ४ एप्रिल १८१८ " अशी वाचावी, अशी विनंती आहे.



अनुक्रमणिका

श्री. ना. गो. चापेकर

# यंत्रयुग विरुद्ध शेतकीयुग

वरील दोन युगांत दोन ध्रुवांइतकें अंतर आहे. यंत्रयुग हें तिसरें युग आहे. पहिलें शिकारी आणि दुसरें शेतकी. पहिलीं दोन युगें आहाराच्या भिन्न प्रकारांतून निर्माण झालीं तर तिसरें युग ऐषआरामाच्या भोगलालसेंत जन्म पावलें. धान्योत्पादनाच्या पूर्वीं कांहीं थोडे लोक वनस्पतींचीं कंदमुळें भक्षण करून निर्वाह करीत, तर दुसरे पशुपक्ष्यांच्या कच्च्या अगर भाजलेल्या मांसावर जगत. हें मांस शिकार करूनच मिळणार हें उघड आहे; आणि पशुपक्ष्यांची शिकार म्हणजे रानावनांतून हिंडणें. हे लोक बेघर असत. 'चराति चरतो भगः' असें त्यांचें वर्णन करितां येईल. कालांतरानें जमिनींतून धान्याची उपज करण्याची कला साध्य झाली तेव्हां वर्षभर एकाच स्थळीं राहणें भाग पडलें. ह्यास्तव घराची आवश्यकता उत्पन्न होऊन लोक घरें करून राहूं लागले. चरत्व जाऊन स्थिरत्व लाभलें. घर व शेती ह्यांनीं मनुष्याच्या जीवनांत क्रांति घडवून आणली. युग शब्दानें सामान्यत: कालविभाग प्रतीत होतो. मात्र तो अनिश्चित असतो. ऋग्वेदकालापासून आतांपर्यंत निरनिराळा कालावधि व्यक्त करण्याला युग शब्द वापरण्यांत आला आहे. ह्या लेखांत युग शब्द ह्या सामान्य अर्थानें वापरलेला नाहीं. येथें वापरलेल्या युग शब्दाचा अर्थ चार युगांच्या कल्पनेला जुळणारा आहे. ज्या काल-खंडांत एखाद्या विशिष्ट परिस्थितीचें इतकें प्राबल्य असतें कीं, मनुष्याची राहणी, त्याचे विचार, आचार, त्याचें ध्येय ह्यांचें नियमन ती परिस्थिति करते; मनुष्याचें जीवन साफ पालटतें; त्या कालाला युग म्हणतात. युगधर्म आपल्या परिचयाचा आहे. तो हेंच सुचवितो कीं, युगानुरूप धर्महि बदलतो. युगाचा प्रतिनिधि ह्या अर्थानें युगमनुष्य संबोधण्यास हरकत नाहीं. सांप्रत युगपुरूष शब्द प्रचारांत येत आहे; परंतु तो भिन्नार्थानें. आपल्या अलौकिक विचारशक्तीनें जो अपूर्व वैचारिक घटना निर्माण करतो व जिचे परिणाम विश्वव्यापी होतात त्यालाच युगपुरूष म्हणणें युक्त ठरेल. निसर्ग अगर परिस्थिति ह्यांच्याशीं मनुष्य अगदीं जखडलेला असतो. त्यांची ताटातूट करणें दुर्घट कर्म आहे. सामान्यतः परिस्थिति माणसावर मात करते; उलट मनुष्य क्वचित् परिस्थितीला शरणागति पतकरण्यास भाग पाडतो. मनुष्याची बुद्धि अविकसित असते त्यावेळीं तो परिस्थितीचा पायिक बनून राहतो. यंत्रनिर्मात्यानें शेतकी युग ठार केलें. गांधींनीं निःशस्त्र प्रतिकाराची योजना आंखून शस्त्रास्त्रांनीं बलाढ्य असलेल्या राष्ट्राला चीत करतां येतें हें सिद्ध केलें. आज शांततेच्या गोष्टी तरी बोलणें हें शिष्टसंमत होऊं पाहात आहे. अशांना युगपुरुष म्हणतां येईल. थोर पुरुष पुष्कळ होऊन गेले. तथापि त्यांस युगपुरुष म्हणणें यथार्थ होणार नाहीं. एकट्या हिटलरनें सर्व जगाला कित्येक वर्षें सळो कीं पळो करून सोडलें, तो हिटलरहि युगपुरुष या संज्ञेस पात्र होणार नाहीं. हिटलरच्या पूर्वीं नेपोलियननें बहुतेक युरोपखंड पादाक्रांत केलें. कृष्णानें कुटिल नीतीचा अवलंब करून तरकटें रचून भारती युद्धांत पांडवांना जय मिळवून दिला; तथापि अशा कृत्यांनीं युगपुरुष होत नाहीं. अपरंपार शौर्य किंवा अजोड युक्तिबाजपणा अथवा कावेबाजपणा हीं युगपुरुषपदवीच्या प्राप्तीला अपुरीं कारणें ठरतात. अखिल मानवी जीवनावर त्यांचा प्रत्यक्ष परिणाम होत नाहीं.

युगभेदानें समाज खळवळून निघावा लागतो. युग-पुरुष शब्दानें थोडीशी वांकडी वाट करावी लागली. तथापि युगाचा अर्थ विशद करण्यास हें विषयांतर अवश्य होतें; आतां मार्गी लागण्यास हरकत नाहीं.

## परस्पर विरोधी युगांचें मिश्रण – राष्ट्रोन्नतीस प्रतिबंधक !

हें ध्यानांत ठेवणें अवश्य आहे कीं, युगांतर झालें तरी गतयुग निरनिराळ्या स्वरूपांत व कमी-अधिक प्रमाणांत नवीन युगांत बहुत काळ रेंगाळत असतें. उदाहरणार्थ, ह्या तृतीय युगांत पहिल्या शिकारी युगाच्या कांहीं पुसट खुणा अद्यापि दृग्गोचर होतात. युगांतरानें नवीव उद्भवलेली परिस्थिति मनुष्याला एका बाजूला खेचीत असते, उलट गत-युगांतील अंगीं मुरलेल्या व सराव पडलेल्या आचार-विचारांशीं, चालीरीतींशी तो जखडलेला असतो. त्यांचा त्याला अभिमान वाटतो; परंपरेच्या वंचक व अभिमानोत्पादक नांवाखालीं मनुष्य त्यांचें समर्थन करितो. सामान्य जनांना परिस्थितीचें आकलन होत नाहीं. अशा प्रकारें जुनें आणि नवें ह्यांचा झगडा सुरू होतो; ह्यालाच पुराणवाद व सुधारणा-वाद म्हणतात. युरपमध्यें शेतीयुग जवळ जवळ संपुष्टांत आलें असून यंत्रयुगाला सर्वजण सरावल्या-सारखे झाले आहेत. आपल्याकडे यंत्रयुग आतां कोठें क्षितिजावर अंधुक असें दिसत आहे. ह्या बदललेल्या युगाची कल्पना अद्यापि आम्हांला आलेली नाहीं. दोन युगांचे धर्म जेव्हां परस्पर विरोधी अथवा विसंगत असतात तेव्हां दोहोंचें साहचर्य अगर मिश्रण जाचक झाल्याविना राहात नाहीं. राष्ट्रोन्नतीला हा प्रकार प्रतिबंधक ठरतो. शेती आणि यंत्र ही विरोधी घटना आहे. शेतीयुगांत मनुष्य जमिनीला चिकटून असतो तर यांत्रिक युगांत तो यंत्राभोवतीं घिरट्या घालीत असतो. शेतीयुगांत खेडीं बहुसंख्य असतात तर यांत्रिक युगांत बहुसंख्य शहरें जन्मास येतात. आज भारतांत शहरें झपाट्यानें वर येत आहेत. खेडीं शहरें बनत आहेत.

कृषिप्रधान कालांत मनुष्य त्याला पुरेल व झेपेल इतकी जमीन पिकवून तिच्यावर निर्वाह करून राहतो. पिकाच्या जमिनीखेरीज त्याला आणखी मोकळी जागा व्यापावी लागते. त्याचा नांगर लांब-लचक असतो. नांगरासाठीं त्याला बैल बाळगावे लागतात; बैलांची उपज होण्याकरतां गाई राखणें प्राप्त होतें. हंगामीं पेरण्याचें बीं संग्रहीं ठेवावें लागतें; गुरांच्या शेणाचा ढीग घराशेजारची जागा अडवतो; घरापासून थोड्या अंतरावर गवत-पेंढ्याचे माच आठ महिने उभे असतातच. वर्षभर पुरेल इतक्या धान्यानें भरलेले कणगे अंगणांत घराची जणूं काय राखण करीत असतात; घराच्या एका बाजूला कापणीनंतर भाऱ्यांची रास करून अगर सुक-ण्यासाठीं पसरून ठेवण्यास मोकळी जागा हवींच; नंतर भारे झोडण्याला खळें करावें लागतें. एवढ्या पसाऱ्याला जागा मोठी लागणार हें उघड आहे. अशा शेतकऱ्यांचा जम शहरांत बसणें अशक्य आहे. ह्यावरून जेथें यंत्र हें निर्वाहाचें साधन असतें तें शहर व शेती हेंच उपजीविकेचें साधन असतें तें खेडें असें म्हणतां येईल. ह्याशिवाय आणखी असें सामान्यतः म्हणतां येईल कीं, शहराला शेती वर्ज्य आणि खेड्यांना यंत्र वर्ज्य.

## खेड्यांतील धंदे व तत्संबंधित – शब्दांचा विकास

शेती करण्याच्या पद्धतींत प्रगति होत गेली तस-तसे दुसरे धंदे अस्तित्वांत आले. कुदळीनें जमीन प्रथम उकरीत. ह्यास्तव लोहाराचा धंदा पहिल्यानें उद्भवला असावा; नांगराच्या क्लृप्तीनें सुतार जन्मास आला. प्रथम लोहार नंतर सुतार अशीं हीं दोन बालकें शेतीच्या पोटांतून निपजलीं. शेतीच्या कामीं नांगरानें कुदळीची जागा घेतली. ह्यापुढें कळीचा नांगर साध्या नांगराला हुसकावील. प्राचीन काळीं

शेती ब्राह्मण करीत नसतील असें नाहीं. तेव्हां औतांचे शब्द संस्कृत असणें संभवनीय आहे. ह्या विचारानें कुदळ शब्दाची व्युत्पत्ति कु+दल अशी देतां येईल. जमीन ज्याच्या योगानें फोडली जाते तें हत्यार म्हणजे कुदल (ळ). कुद्दाल शब्द अज्ञानानें बनला असावा. सूत्रधार पासून सुतार शब्द व्युत्पादणें कितपत समर्थनीय होईल ह्याविषयीं शंका वाटते. सूत्राचा सुतार कामाशीं निकटचा संबंध दिसत नाहीं. सुवर्णकार तर मागून आलेले असावे. लोहार, सुतार, कासार, पाथरवट आणि सोनार ह्यांची पांचाल ह्या नांवाखालीं एकजूट कधीं व कोणत्या कारणानें झालीं तें समजत नाहीं. ह्या पांचाळांत गवंड्याला स्थान नाहीं. गवंडी शब्दाची व्युत्पत्ति सुद्धां कोणी देत नाहीं. हा शब्द कोठून आला ? ऋग्वेदांत शेतीचा उल्लेख आहे. कृषि शब्द आहे. नांगरलेल्या जमिनीला सीता शब्द होता. परंतु शेतीच्या निरनिराळ्या अंगांचीं नांवें आढळत नाहींत. औतांचींहि नांवें कमीच. दात्र हें कोयत्यासारखें पीक कापण्याचें हत्यार असावें. ऋग्वेदांतील शब्दांचे अर्थ अद्यापि निश्चित झालेले नाहींत. उदा. सृणि. हें कांहीं असलें तरी इतकें खरें कीं, आजचे शब्द वैदिक भाषेंतून निघालेले नाहींत. त्यांचा उदय संस्कृत भाषेच्या पोटांतून झाला अशी समजूत आहे. **माझ्या मतें शेतीविषयक शब्द संस्कृतेतर भाषांतील असावे.** संस्कृत बोलणाऱ्या अथवा जाणणाऱ्या ब्राह्मणांना स्मृतिकारांनीं शेती करण्याची मनाई केली. ह्यास्तव शेतीच्या व्यवसायांतील शब्द ब्राह्मणांच्या भाषेंत म्हणजे संस्कृतांत शोधणें अप्रयोजक होईल. संस्कृतज्ञांनीं नांगराचा लांगर बनवला. नलयोरभेदः बवयोरभेदः हे नियम संस्कृतोद्भव शब्दांना लागणारे आहेत. उदा. हिंदी व मराठी नांगर शब्द गुजराथी व पंजाबींत लगर असा उच्चारला जातो. ऋग्वेदांत यव धान्याचाच विशेष उल्लेख येतो. असो. युगपुरुषाप्रमाणें शब्दचिकित्सा हा भाग म्हणजे मुख्य विषयावर अतिक्रमणच आहे. ह्या अतिक्रमणाच्या समर्थनार्थ इतकेंच म्हणतां येईल कीं, मुख्य विषयाच्या चर्चेंत आनुषंगिक विषय त्यांच्या महत्त्वामुळें जबरदस्तीनें घुसतात; अनिच्छेनें त्यांचा परामर्श घेणें भाग पडतें.

## नव्या युगांतील जमा-खर्चाचें व्यस्त प्रमाण

लहानसहान तुकड्यांच्या शेतीवर लोकसंख्या थोडी होती तेव्हां शेतकरी आपली गुजराण कशीतरी करीत असे. परंतु वाढत्या लोकसंख्येमुळें हातातोंडाशीं गांठ पडण्याची मारामार पडूं लागली. लोकसंख्या व अन्नोत्पादन ह्यांचा मेळ असेल तरच मनुष्य दोन घांस सुखानें खाईल. ह्याच्या उलट खाणारीं तोंडें पुष्कळ व अन्न अपुरें अशा स्थितींत मनुष्याचें जीवन कष्टप्रद होणें साहजिक आहे. भारतांत दर माणशीं एक एकर जमीन पडते. ह्या एकराच्या उत्पन्नांत एका माणसाचा निर्वाहहि होणें शक्य नाहीं. यंत्रयुगाच्या आधींच्या काळांत ह्या निपुऱ्या उत्पन्नांत शेतकरी जेम तेम गुजारा करून तोहि एक वर्षाच्या कर्जांत राहून आयुष्य ढकलीत असे. यंत्रानें त्याच्या सभोंवारें सुखसोयी आणल्या; त्याच्या गरजा वाढल्या. कांहीं आवश्यक तर कांहीं नुसत्या मोहक, तसेंच त्याच्या आकांक्षा उसळूं लागल्या. ह्यास्तव आजच्या शेतकऱ्याचा गुदमरा होत आहे. जुनी घडी मोडली. नवी घडी बसली नाहीं. यंत्रा बरोबर शहरें वाढलीं म्हणून वर आलेंच आहे. ह्या शहरांतील लोकांच्या राहणींत एकदम बदल झाला. पेहराव, रिवाज, आचार, विचार ह्यांचा मुखवटा न ओळखण्याइतका पालटला. जुन्या काळच्या शिष्टाचाराला चाट मिळून संभावितपणाच्या नव्या कल्पना रूढ झाल्या. उदा. लंगोटी सुटून धोतरानें व तुमानीनें तिची जागा घेतली. उघड्या अंगानें गांवांत हिंडणें गांवढळपणाचें ठरून सद्रे-रेशमीसुद्धां वापरण्यांत येऊं लागले. सरकारी कामासाठीं जाऱ्ये करावी लागून प्रवास खर्च होऊं लागला. असे एक ना दोन, सर्व

मनच पालटला. ह्याप्रमाणें खर्चाला असंख्य पाय फुटले; आयांत फरक नाहीं. वाढत्या खर्चाबरोबर उत्पन्नहि वाढलें पाहिजे. परंतु बहुजनांच्या बाबतींत हें अशक्य आहे. सुधारणा ही गळ्यांत पडणारी मेनका आहे. ह्यास्तव खर्चाचें पाऊल पुढें व आयाचें मागें अशी स्थिति सामान्य माणसासंबंधानें नेहमींच राहणार. शेवी सुधारण्याच्या मार्गांत ही मोठी धोंड आहे.

## शेतकरीवर्गाची स्थिति : दुःस्थितीवर उपाय

कूळकायद्यानें शेतकरी सुधारला हें अंशतः खरें परंतु त्याचा अर्थ त्याच्या हातांत पूर्वीपेक्षां अधिक पैसे पडूं लागले. तथापि माणसाचा सोस— त्याचा हव्यास ह्याला अंत नसतो. सुधारणा याचा अर्थ सुखसोईची वाढ. ही माणसाच्या कल्पकतेवर अवलंबून असते. मनुष्य हा परमेश्वराचा अवतार असल्यानें त्याची कल्पकताहि अमर्याद असणें स्वाभाविक आहे. इकडे मनुष्य मिळेल तितकें सुख मिळविण्याची धडपड करीत असतो. ह्या धडपडीला यश येण्यास पैसा हवा. द्रव्यलाभ तर कष्टावांचून होणें अशक्य आणि कष्ट करण्याला सीमा आहे. शरीरसामर्थ्य परिमित तर बुद्धिसामर्थ्य अमेय. मानवी बुद्धि वासना चेतविते; परंतु ह्या उद्दीप्त झालेल्या वासनांची तृप्ति होण्याची शक्ति निपुरी पडते, त्या कारणानें सर्वत्र असमाधान, पिरपीर, उद्वेग इत्यादि उद्भवतात. भौतिक सृष्ट पदार्थांच्या उपभोगानें सुखाचा ओलावा लागेल ह्या आशेनें तो सुखाच्या मागें धांवत असतो आणि अधिकाधिक आशा-भंगानें पोळून निघतो. सुख वस्तूंत नसतें तो मनाचा धर्म आहे; त्याच्यापाशींच तें आहे हें त्याला समजत नाहीं. पुष्कळ पैसे मिळाले म्हणजे मी अधिक सुखी होईन ही सामान्य माणसांची कल्पना. मग अशिक्षित शेतकऱ्यांविषयीं काय बोलावें ? विवेक जर नसेल तर राजापासून रंकापर्यंत सर्व दुःखीच राहतील. ह्याचा अर्थ अर्धे पोटी लोकांनीं आपल्याला सुखी समजून स्वस्थ बसावें असा नाहीं. निर्वाहाला आवश्यक वस्तु कोणत्या व किती ह्याचा निर्णय प्रथम करावा लागेल. अप्रयोजक वस्तूंना कांटा देण्याचा उपदेश युक्त आहे. तथापि त्यापूर्वी प्रयोजक वस्तु निश्चित करणें अगत्याचें आहे. लोक-शाहींत सक्तीला स्थान नसल्यानें उपदेशाला म्हणजे शिक्षणाला फार महत्त्व आहे. अशा प्रकारचें शिक्षण प्राथमिक शाळा व शिक्षकवर्ग चतुर असेल तर देणें कठीण नाहीं. सध्या आहे बाप अनावश्यक अशा चैनीच्या वस्तू मुलांसाठीं खरेदी करून मुलांचे लाड पुरवितात. ह्यामुळें बाळपणापासून छान-छोकीची सवय लागते. परिणामीं आवश्यक वस्तूंची अळंटळं होऊन नसल्या तरी चालेल अशा वस्तूंवर पैसा खर्च होतो. आधींच अन्नवस्त्राला पुरेसा पैसा नाहीं. त्यांत अशा फालतु वस्तु घरांत आल्या म्हणजे शेतकरी जेरीस कां येणार नाहीं ? शेत अडून बसत नाहीं. थोड्याशा मेहनतीनें कांहीं तरी पिकतें. अशा स्थितींत भाताचे भाव वाढवून सरकार शेतकऱ्याला आळशी बनवितें. भाव वाढवून दिले तर तो अधिक मेहनत करील व अधिक धान्य पिकवील हा तर्क सर्व ठिकाणी बरोबर ठरणार नाहीं. तसेंच भाताचे भाव वाढविले म्हणजे मजुरी वाढते, उत्पादन-खर्चांत चढ होतो. अखेर महागाई. ह्याहून शेत-कऱ्याला रोख पैसा देऊन मदत करणें बरें. किंमती वाढल्या कीं ओरड व भाताचे दर उतरले कीं तशीच ओरड; हें अर्थशास्त्र कोणतें समजत नाहीं. तात्पर्य, कोंकणांतील शेतकरी दरिद्री. त्याच्या जवळ ना भांडवल ना शिक्षण; अशा स्थितींत अधिक धान्य तो पिकवील ही अपेक्षा भ्रामक आहे. मी असें पाहतों कीं शेतकऱ्याला सरकार अंगावर खत देतें, तो काय करितो ? तें दुसऱ्याला विकतो आणि त्याचे दक्के करतो. शेताला त्यानें खत वापरलें कीं नाहीं हें सरकारी अधिकारी बघत नाहींत, अशा

रीतीनें सरकारी पैसा मातींत जातो. खाण्यांत किंवा चैन करण्यांत जातो. ह्यास्तव सरकारनें आपली जमीन आपण लावावी हें उत्तम. नाहीं तरी तत्वत: जमीन सरकार आपली मानते. मग स्वत:ची वस्तु अडाणी, कंगाल, परंपरेला जखडलेले अशा माणसांच्या स्वाधीन करून तुम्ही ती "सुफला" करून दाखवा असा आग्रह धरणें हा शहाणपणाचा मार्ग नाहीं. सरकारनें शेतकी पदवीधर नेमून त्यांच्या देखरेखीखाली शेतकऱ्यांकडून लागवड करून घ्यावी. असें झालें तरच उत्पन्नांत वाढ होईल. सध्यां शेतजमीन म्हणजे उदरनिर्वाहाचें साधन मानण्यांत येतें. त्याऐवजीं यंत्राप्रमाणें धनोत्पादनाचें साधन ह्या दृष्टीनेंच धान्योत्पादक जमिनीकडे सरकारनें पाहिलें पाहिजे. बाकीचे उद्योग-धंद्यांचें राष्ट्रीयीकरण करण्याची जर आवश्यकता भासते तर जमिनीपुरता अपवाद करण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. सहकारी संस्था स्थापून उत्पन्न वाढेल असें अनुभवाच्या अभावीं खात्रीनें म्हणतां येणार नाहीं. मी आमच्या गांवाचेंच उदाहरण घेतों. ह्या गांवावर ५०० एकर जमीन भात शेतीची आहे. सरसकट ४० मण भात एकरीं निघत नाहीं हें निश्चित. हळवार व गर्वें मिळून अधिकांत अधिक ३० मण भात एकरी पिकेल असें मी धरून चालतों. आतांच एका समंजस शेतकऱ्यानें सांगितलें कीं त्याच्या ८ एकर जमिनींत साधारणपणें ९ खंडी भात होतें. वास्तविक १२ खंडी झालें पाहिजे. ह्याचीं घरचीं ६।७ माणसें स्वत:च्या शेतांत राबतात. भांडवल नसल्यानें खत विकत घेणें त्यास अशक्य आहे. गांवांत व घरचें शेण मिळेल तेवढेंच खत. ग्रामपंचायतीकडून अथवा भंग्याला परस्पर सांगून मैला शेतांत खळगे खणून त्यांत टाकून त्याचें खत कां नाहीं करीत असें मी विचारलें तेव्हां मला असें दिसून आलें कीं ह्याचा त्यानें विचारच केला नव्हता. ह्यावरून गांवांत मार्गदर्शकत्व अगर नेतृत्व यांचा पूर्ण अभाव सिद्ध होतो. सरकारी अधिकाऱ्यांत अशा गोष्टींचा विचार करण्याची कुवत नाहीं. अशा रीतीनें प्रत्येक खेडें पोरकें झालें आहे. वेंधळे सरकारी कामगार आणि बुभुक्षित लोक ह्यांच्या हातीं सरकार सहकारी संस्था काढून पैसा ओतणार, तो वाया जाणार ह्यांत संशय नाहीं. सरकारला बुडवण्यास लोक टपून बसले आहेत. म्हणून सर्व जमीन सरकारच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं आली पाहिजे. बिघ्यामागें ६०, ७०, ८०, मण भात पिकूं शकतें असें जाहीर केलें जातें व सरकार इतकें भात पिकविणारास बक्षीसहि देतें. मी इतका आशाळभूत नाहीं. तूर्त ४० मण भाताचा अजमास आपण करूं. ५००×४०=२०००० मण भात झालें. ह्याची किंमत गुदस्तां १५ रु. मणानें भाताची विक्री झाली, ह्या दरानें तीन लक्ष ( ३००००० ) रु. सरकारला मिळतील. आमच्या गांवांत १५० शेतकरी कुटुंबें आहेत. ह्यांच्या जमिनी काढून घ्यावयाच्या तर त्यांना मजुरीच्या अगर अन्यरूपानें मोबदला मिळणें रास्त आहे. एका कुटुंबाला (पांच माणसांचें कुटुंब) दरमहा १०० रु. उपजीविकेला लागतात असें मानलें तरी १८०००० रु. ची आपणांस त्यांना पोंच करितां येईल. हा खर्च शेतांतील कामाबद्दल. शेताला खत घालणें अवश्य आहे. एकरीं ५० रु. चें खत भरपूर होईल. ५०० एकर जमिनीला २५०००रु. चें खत लागेल. १८००००+२५००० =२०५००० (दोन लक्ष पांच हजार) ही रक्कम तीन लक्षांतून वजा करितां बाकी ९५००० रु. शिल्लक राहतात. ह्यांतून अधिकाऱ्यांचे पगार, औतें व इतर किरकोळ खर्च भागवितां येईल. ह्यामध्यें काय साधलें तें पाहूं. १५० कुटुंबांना दरमहा शंभर रुपयांची हमी मिळाली असें म्हणावयास हरकत नाहीं. जमिनी गेल्याबद्दल त्यांना हळहळ वाटण्याचें कारण नाहीं. पिकांत पांच हजार मणांची वाढ आणि लोकांना शास्त्रीय कृषिकर्माचें शिक्षण हा लाभ क्षुल्लक नाहीं. खर्चाचें प्रमाण सांगतांना मी हात सैल सोडला आहे,

व उत्पन्नाचा अंदाज करितांना आंखडता घेतला आहे, हें ध्यानांत ठेवावें. ह्याखेरीज इतर फायदे कमी नाहींत. नदीच्या पाण्यावर उन्हाळीं पिकें काढतां येतील. सध्यां बांधांत जी जागा अडली जाते ती पिकाखालीं आणतां येईल. ५०० एकर वरकस जमिनीचा किफायतशीर उपयोग करितां येईल. जमिनीचें राष्ट्रीयीकरण करणें हाच धोपट मार्ग आहे. सालोसाल इतकें नुकसान सोसणें मूर्खपणाचें होईल. लोकांकडून धान्योत्पादनाची वाढ होईल ही अपेक्षा फोल आहे. खतापायीं पंचवीस हजार रुपये खर्च करण्याचें सामर्थ्य लोकांत नाहीं. नवीन नवीन प्रयोग करून पाहण्याचा उत्साह नाहीं. सरकारनें शेतकऱ्याला पैसा दिला तर तो खाण्याकडे खर्च करील. जमीन तशीच उपाशी ठेवील. सरकारचा नोकरवर्ग शेतकऱ्या इतकाच आडमुठा. जपानी पद्धतीनें शेतें लावण्याचा प्रयत्न करावा असें फरमान वरतून आलें तेव्हां मामलेदारांची हालचाल सुरू झाली. गांवांत एकेकाला बोलावून तुम्हीं एक किंवा दोन एकर जमीन जपानी पद्धतीनें लावली पाहिजे अशी सक्तीची भाषा मामलेदार बोलूं लागले. लोकांना पटेल अशा रीतीनें बोलणें त्यांना माहीत नाहीं. अशा रीतीनें सरकारचें कार्य मात्र ते नासून टाकतात.

एका खेड्यांत हा प्रयोग करून पाहा. लोकांची खात्री झाली कीं मग त्यांच्या स्वाधीन जरूर तर जमिनी परत करा. हेंहि होत नसेल तर एखाद दोन इसमांच्या जमिनी स्वतः सरकारी शेती खात्यानें लावून अधिक पीक कसें काढतां येईल हें लोकांना पटवून द्यावें, असो. जंगलें सरकारनें आपल्या ताब्यांत घेतलीं तर लागवडीची म्हणजे धान्य पिकाची जमीन घेण्यास हरकत कोणती ?

शेती करणें म्हणजे जमिनींतून धान्य उत्पन्न करणें हा बिनभांडवलाचा धंदा आहे ही समजूत साफ चुकीची आहे. शेतीला योग्य वेळीं जरूर तितकें पाणी मिळालें पाहिजे. आकाशांतून पडणाऱ्या पाण्यावर अवलंबून असणारी शेती ही शेतीच नव्हे. धान्योत्पादनाच्या हिशेबांत तिला स्थान नाहीं. पाऊस कधीं फाजील, कधीं तुटपुंजा आणि कधीं नको तेव्हां व कधीं हवा तेव्हां नाहीं. पाऊस जास्त पडत राहिला तर हळवार भाताला धोका लागतो. तसेंच पावसाळा किंचित् अगोदर संपला तर गव्हाला धक्का बसतो. अशा स्थितींतल्या जमिनीच्या पिकावर अवलंबून राहणें मुत्सद्दीपणाचें नाहीं. यथाकाल, यथावकाश पाणी शेताला हमखास मिळवितां येईल अशी व्यवस्था करण्यास भांडवल पाहिजे. तसेंच शास्त्रीय ज्ञान पाहिजे. एकट्या दुकट्याचें हें काम नाहीं. ह्यास्तव सरकारनेंच शेतीचा धंदा उचलला पाहिजे. कुणब्याला चार-पांच बिघे जमीन देऊन त्याला पर्जन्याच्या स्वाधीन करणें ही आदिमानवाला शोभणारी पद्धत होय. सुधारणेच्या शिगीस पोचलेल्या चालू युगांत ती बसणारी नाहीं. सारांश, जमिनीचें राष्ट्रीयीकरण होणें अपरिहार्य आहे. नियंत्रित पाणीपुरवठा सरकारावांचून कोण करणार. शेती हा भांडवली धंदा आहे.

---

श्री. न. र. फाटक

# अलीकडील टिळक चरित्रें

## लेखांक दुसरा

या लेखांत काँग्रेसनें देऊं केलेल्या बक्षिसाबाहेरच्या टिळकचरित्रांचा विचार करावयाचा आहे. अशीं चरित्राचीं पुस्तकें पांच दाखवितां येतात; पण त्यांतलें एक अमेरिकन व्यक्तीनें लिहिलेलें असून दुसरें महाराष्ट्रियाचें असलें तरी अगदींच किरकोळ टिपणवजा असल्यामुळें वगळलें आहे. उरलेल्यापैकीं तीनच पुस्तकें परामर्शार्थ निवडलीं आहेत. त्यांत वस्तुत: अग्रगण्यत्वाचा मान केसरी—मराठा ट्रस्टच्या विद्यमानें 'अधिकृत'त्वाच्या शिफारसीसह लोकांसमोर आलेल्या पुस्तकास देणें सकृद्दर्शनीं सहजच योग्य वाटतें; परंतु 'अधिकृत' या शिफारसीकडे लक्ष देऊनच त्याला थोडा वेळ मागें ठेवणें अवश्य वाटलें व त्याऐवजीं भारतसरकाराचे व्यापारमंत्री श्री. करमरकर यांच्या पुस्तकाला अग्रस्थान देण्याचें योजिलें आहे. प्रस्तुत योजनेंत दुसरें स्थान श्री. रामगोपाल यांच्या पुस्तकाला असून शेवटीं 'अधिकृत' चरित्राची ओळख करून देण्याचा संकेत आहे. ज्यांच्या वांट्यास काँग्रेसचें बक्षीस सारख्या हिस्सेराशीनें आलें, त्यांचा तुलनात्मक स्वतंत्र विचार केल्यास तो वावगा ठरूं नये अशी अपेक्षा.

श्री. करमरकरांच्या पुस्तकाचा परिचय पुठ्यावरील कागदाच्या आंत छापलेला असून त्यांत म्हटलें आहे कीं १८८० ते १९२० या कालावधींत देशांमध्यें स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं चालू असलेल्या आंदोलनाचें समालोचन टिळकांच्या या चरित्रांत पहायला सांपडेल. हें म्हणणें कांहींसें अतिव्यापक आहे. टिळकांच्या चरित्रांत अखिल भारतीय आंदोलनाचे पडसाद असले तरी तेवढ्यानें सगळ्या आंदोलनाची कल्पना होऊं शकत नाहीं. टिळकांच्या हयातींत महाराष्ट्रेतर प्रदेशामध्यें आंदोलनांची खळबळ चाललेली होती. त्या साऱ्या खळबळीचें दर्शन टिळकांच्या चरित्रांत घडणें शक्य नाहीं. एवढ्यासाठींच वर पुस्तकपरिचयाच्या पूर्वोक्त मजकुराबद्दल अतिव्यापक हा शेरा द्यावा लागला. श्री. करमरकरांनीं आजवर सरकारी दप्तरखान्यांत दडवून ठेवलेल्या कागदांचा उपयोग केला, अशा अर्थाचें सदर परिचयांत दुसरें विधान आहे. चालू स्वराज्यकाळांत हे कागद जिज्ञासूंना दुर्मिळ नाहींत. टिळकांच्या दुसऱ्या चरित्रलेखकांनीं देखील त्या कागदांचा फायदा घेतलेला आहे. अर्थात् प्रत्येकानें आपल्या दृष्टीस अनुसरून त्यांची निवड केलेली आहे. सारांश सरकारी कागदांच्या उपयोगाला श्री. करमरकरासंबंधांत अनन्यसाधारणत्व राहिलेलें नाहीं. त्यांच्या पुस्तकाचा एखादा विशेषच सांगावयाचा तर तो मुख्य प्रधान पं. जवाहरलाल नेहरूंच्या भाषणांतील जो उतारा त्यांनीं पुस्तकाच्या आरंभीं जोडलेला आहे, त्या उताऱ्याचा सांगतां येईल. पंडितजींचें हें भाषण खासगी नव्हतें लोकसभेंत टिळकांच्या चित्राचें अनावरण पंडितजींनीं केलें तेव्हांच्या भाषणांतील तो उतारा पंडितजींच्या परवानगीनें छापला याचेंहि एक विशेष म्हणून कौतुक करायला हरकत नाहीं. त्या उताऱ्यांत टिळकांच्या कर्तृत्वाची गौरवपर वाच्यता आहे. श्री. करमरकरांच्या पुस्तकाशीं त्याचा कांहींच संबंध नाहीं. पंडितजींनीं ज्याची प्रसंगपरत्वें मुक्तकंठानें प्रशंसा गाइली त्याचें चरित्र लिहून काढण्याची कामगिरी आपण बजावली असें श्री. करमरकरांना अप्रत्यक्षपणें सुचवायचें असेल तर गोष्ट निराळी. तो उतारा आणि

पुस्तकाच्या शेवटीं जोडलेले टिळकांविषयींचे अभिप्राय यांची योग्यता अभिप्रायदात्यांची हयात व मयत ही वर्गवारी डोळयाआड ठेवल्यास सारखीच मानतां येईल. पंडितजींच्या भाषणांतील उतारा अलंकारासारखा आहे.

श्री. करमरकरांच्या पुस्तकांत कालानुक्रमानें एकूण सतरा प्रकरणांत टिळकांचें चरित्र विभागलेलें आहे. पहिल्या प्रकरणांत टिळकांचें बालपण व शिक्षण एवढा विषय पांच पानांत आवरला असून पुढचीं दोन प्रकरणें टिळकांपूर्वीचा हिंदुस्थान आणि टिळकांपूर्वीचा महाराष्ट्र या विषयास वाहिलेलीं आहेत. दोन्हींचा विस्तार तीस पानांचा आहे. श्री. करमरकरांनीं आपले विषय कसे संक्षेपानें मांडले आहेत, एवढाच प्रकरणांचीं पानें नमूद करण्याचा हेतु आहे. बहुतेक सारीं प्रकरणें अशींच आहेत. कदाचित् ग्रंथाच्या परिचयांत सुचविल्याप्रमाणें हा संक्षेप प्रस्तुत विषयाच्या ( स्वातंत्र्यप्राप्तीची चळवळ किंवा टिळकांचें चरित्र ) अभ्यासकांची जिज्ञासा वाढविण्यासाठींहि असेल; तथापि संक्षेपांत संदिग्धता नाहीं, हें कबूल करायला पाहिजे. श्री. करमरकरांनीं जें प्रतिपाद्य स्वीकारलें त्याची स्पष्टता संक्षेपानें झांकली गेलेली नाहीं.

टिळकांच्या कर्तृत्वाची सर्वश्रुत स्थूल रूपरेषा पूर्वीं दाखविलेली आहे. तीच कालानुक्रमानें श्री. करमरकरांनीं अनुसरावी यांत आश्चर्य नाहीं. या रूपरेषेंत बिनचूकपणाच्या दृष्टीनें कांहीं घोटाळे आढळतात. हे घोटाळे पूर्वींच्या चरित्रलेखकांनीं उत्पन्न केलेले आहेत. शिवाजीमहाराजांच्या समाधीची दुर्दशा एका इंग्रजानें उघडकीस आणल्यावर त्या समाधीच्या जीर्णोद्धारासाठीं शिवाजी उत्सव अस्तित्वांत आला. त्याच्यामागें न्या. मू. रानडे होते. या उत्सवांत प्रारंभीं ज्यांनीं भाग घेण्याचा उत्साह व्यक्त केला त्या राजेरजवाड्यांनीं सरकारच्या प्रतिकूलतेमुळें आपलें अंग नंतर काढून घेतलें. उत्सवहि त्या योगानें रोडावला. टिळकांनीं त्याला पुनः उठाव आणला, ही हकीकत लिहितांना कालानुक्रमाची संगति श्री. करमरकरांना राखतां आलेली नाहीं. १८९६ च्या सप्टेंबरांत केसरीमध्यें जे दोन अग्रलेख प्रसिद्ध झाले ते टिळकांचे नसून कै. खाडिलकरांचे आहेत, याचा ऊहापोह एकदां घडलेला असूनहि त्याची दखल श्री. करमरकरांनीं घेतलेली नाहीं. केसरीचा अग्रलेख म्हटला कीं निरपवादपणें टिळकांचाच या समजुतीनें इतर कित्येक लेखकांची दिशाभूल केली असल्याचीं उदाहरणें देतां येतील.

थोड्याशा अनवधानानें चुका कशा होतात याचीं मौजेखातर दोन उदाहरणें प्रस्तुत अनुरोधानें दाखविल्यास अनाठायीं होणार नाहींत. टिळकांचे व खाडिलकरांचे लेख कोणते हें समजणें सांप्रत सोपें आहे. खाडिलकरांच्या केसरींतील लेखसंग्रहानें त्या संबंधांतली अडचण दूर केलेली आहे. या संग्रहाची उपेक्षा टिळकांच्या चरित्रकारानें न केल्यास श्रेयस्कर. तथापि ज्या चुका सादर करावयाच्या आहेत, त्या श्री. करमरकरांच्या निदर्शनास कोणीतरी आणून दिल्याचा संभव असतांहि त्यांचा निर्देश करणें भाग आहे. कोणी या चुका क्षुल्लक आहेत, असेंहि समर्थन करूं शकतील. असल्या समर्थनानें चुकीचा दोष टळत नाहीं. एक चूक चित्राची आहे. पान २४-२५ च्या मध्यें चार पानें चित्रांचीं आहेत. शेवटच्या पानावर दादाभाई नौरोजींच्या शेजारीं उजव्या बाजूस फेरोजशहा मेथांचें नांव दिलेलें चित्र दीनशा वाच्छांचें आहे. याहून अधिक मौज पान २२ वरील जोतीबा फुल्यांच्या माहितीमध्यें आहे. जोतीबांचा जन्म १८७२ मध्यें झाला ( १८२७ ऐवजीं १८७२ हा आंकडा पडला असावा ) त्यांनीं सत्यशोधक समाज १८७३ मध्यें स्थापन केला. १८७१ मध्यें 'दीनबंधु' पत्र काढलें. १८८२ मध्यें टिळक-आगरकर डोंगरीच्या तुरुंगांतून सुटल्यावर त्यांच्या स्वागतसमारंभांत जोतीबांनीं मनःपूर्वक भाग

घेतला. त्यापुढचेंच वाक्य आहे कीं जोतीबा १८७० मध्यें वारले. परंतु एवढ्यानेंच हा गोंधळ थांबलेला नाहीं. १८७० मध्यें ज्योतीबा निवर्तल्याचें वाक्य संपतांच त्यांच्या हयातींत चिपळूणकरांनीं त्यांच्या (जोतीबांच्या) विचारसरणीवर सडकून कोरडे ओढले अशा अर्थाचा मजकूर आहे. १८७० मध्यें निधन पावणारे ज्योतीबा १८७२ मध्यें जन्मास येतात व जन्मल्यापासून एका वर्षांत सत्यशोधक समाज स्थापतात इतकेच नव्हे तर निधनानंतर बारा वर्षें उलटल्यावर टिळक-आगरकरांचें स्वागत करतात हा चमत्कारदेखील लक्षांत ठेवण्याजोगा आहे. आणखी एक चमत्कार १८४८ सालीं मुलींची शाळा ज्योतीबांनी अस्तित्वांत आणल्याचा आहे. ज्योतीबांच्या माहितीचे दोन परिच्छेद असून ओळी १८ आहेत. त्यांत सहा वेळा वर्षांचे आंकडे असल्यानें ते हस्तलिखित आणि कच्चें मुद्रण या दोन्ही प्रसंगीं त्यांत कांहीं गडबड असल्याचें उमगूं नये, याला गाढ अनवधानाखेरीज दुसरें कोणतें कारण संभवतें? अनवधान आणि पूर्वापराची विसंगति हा प्रकार बऱ्याच ठिकाणीं दृष्टीस पडतो. तथापि या प्रकारांचा टिळकचरित्राच्या निवेदनांतच अंतर्भाव होत असल्यामुळें एकंदर टिळकचरित्राला मोठासा धक्का बसत नाहीं.

श्री. रामगोपाल यांनीं लिहिलेल्या टिळकचरित्राकडे पहातांना हे लेखक कोण, हा प्रश्न प्रामुख्यानें वाचकाच्या चित्तांत उभा रहातो. सुदैवानें या प्रश्नाचें उत्तर पुस्तकाच्या पुठ्ठयावरील पांघरुणाच्या कागदावर आलेलें आहे. श्री. रामगोपाल हे स्वातंत्र्यप्राप्तीच्या आंदोलनाचीं साधनें गोळा करण्यासाठीं दिल्लीस जो फड उघडण्यांत आला होता, त्यामध्यें काम करण्याची संधी लाभलेले एक गृहस्थ आहेत. हीं साधनें सामान्यतः ब्रिटिश सरकाराच्या दप्तरांतील 'गुप्त' हा शिक्का मारून ठेवलेल्या कागदांतून निवडलीं जात असल्यानें तीं साधनें श्री. रामगोपाल यांना राबवतां आलीं. पूर्वींच्या म्हणजे १९५६ वर्षाआधीं प्रकाशांत आलेल्या कोणत्याहि चरित्रांत जी माहिती नाहीं, अशी अश्रुतपूर्व अदृष्टपूर्व माहिती आपण लोकांपुढें मांडीत आहो, असें कांहींसें बढाईचें विधान श्री. रामगोपालांच्या प्रस्तावनेंत आहे. या बढाईला शोभणारी माहिती त्यांच्या पुस्तकांत आहे, परंतु तिचा टिळकांच्या प्रत्यक्ष चरित्राशीं संबंध पोंचत नाहीं; व माहितीच्या ज्या चुटक्यांचा संबंध पोंचतो ते चुटके न दिल्यानें टिळकांच्या गौरवाची हानि झाली असती असाहि प्रकार नाहीं. उदा० पान ५५. टिळकांनीं कॉंग्रेसमध्यें प्रवेश केला, त्यावेळीं कॉंग्रेसच्या रजिस्टरांत टिळकांविषयीं जी नोंद केली गेली ती नोंद पहावी. त्या नोंदीचें उद्धरण पूर्वीं वर्णिलेल्या मासल्याचें आहे. या नोंदींत प्रतिनिधीचा क्रमांक, प्रदेश, पदव्या, व्यवसाय व प्रतिनिधि म्हणून जेथें निवड झाली तें ठिकाण इत्यादि तपशील आहे. असल्या तपशीलानें टिळकचरित्रांत कौतुक वाटावें अशी भर टाकल्याचा अनुभव येत नाहीं. हीं निरर्थक तपशीलाचीं उदाहरणें वाढवून जागा अडविण्याचें कारण नाहीं.

श्री. रामगोपाल हे उत्तरभारतीय असल्यानें त्यांना टिळकांच्या जोडीदारांचीं आडनांवें नीट समजूं नयेत, यांत आश्चर्य नाहीं. पान ४१ वर त्यांनीं १८९१ पूर्वींच कै. न. चिं. केळकरांना केसरी-मराठ्याच्या संपादकीय आवारांत आणून सोडलें आहे. टिळकांनीं कायदा शिकविण्याचा वर्ग काढला, त्यांत केळकर हें एक आडनांव आहे. वर्गाच्या प्रारंभीं कै. न. चिं. केळकर टिळकांजवळ नव्हते व त्राटिका नाटकाचे कर्ते कै. वा. बा. केळकर हे कायद्याच्या ज्ञानाचे पदवीधर नव्हते यामुळें त्यांना बाद करावें लागतें. मग कै. न. चिं. केळकरांना चांगलेसें इंग्रजी येत नाहीं, असें टिळकांना कळविणारे केळकर जमेस धरावे लागतात. श्री. राम-

गोपाल यांनीं या विवेचनांत आडनांवांचा विषय स्पष्ट होण्यासाठीं बारीक विचार केला नाहीं, असा निष्कर्ष निघतो. महाराष्ट्राच्या इतिहासाचें योग्यज्ञान नाहीं, याचा प्रत्यय श्री. रामगोपालांच्या लेखनांत अनेकदां येतो. 'आमच्या देशाची स्थिति' हा लेख निबंधमालेच्या एका अंकांत प्रसिद्ध झाला. (पान १९०) वस्तुतः या विषयाकडे बरेच अंक खर्ची पडले आहेत. हीं उदाहरणें किरकोळ या सदरांत ढकलतां येतील व त्यावर असल्या मजकुराची गरज काय होती, असाहि प्रश्न विचारणें शक्य आहे.

श्री. रामगोपाल यांनीं टिळकचरित्राला ६९ प्रकरणें वेंचलीं आहेत. ६९ या आकड्यानें बुजण्याची आवश्यकता नाहीं. 'टिळकांना अटक, जामीनावर सुटका, बचावाचा युक्तिवाद, राज्यद्रोहाचा आरोप, न्यायाचा विपर्यास, तुरुंगांतून बाहेर आले' अशीं एका १८९७ च्या खटल्याचीं अनेक प्रकरणें करून लेखकानें ६९ वर ही संख्या पोचविली आहे. १८९६ सालीं टिळकांनीं साराबंदीची चळवळ आरंभली, वृत्तपत्रें व सरकारी कागद यांच्या साह्यानें आपण या चळवळीचें चित्ताकर्षक वर्णन करूं शकलों, असें श्री. रामगोपाल प्रस्तावनेंत बजावतात, परंतु त्यांचें वर्णन अगदीं सामान्य प्रतीचें आहे. श्री. रामगोपाल यांनीं वृत्तपत्रांतून घेतलेले कांहीं उतारे हा त्यांच्या लेखनाचा विशेष समजतां येईल.

श्री. ताम्हनकरांनीं लिहिलेल्या चरित्रांत नवीन माहिती नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. त्यांत टिळकांच्या हयातीमध्यें टिळकभक्तांमध्यें टिळकांच्या प्रतिपक्षाविषयीं माजलेले पुष्कळसे गैरसमज एकवटलेले आहेत. रानडे गोखले यांचा उल्लेख बहुधा या दोघांचें हीनत्व दर्शविणाऱ्या शब्दांनीं केलेला आढळतो. हे दोघे जिवंत होते त्या काळीं टिळकांनीं आपल्या मताच्या समर्थनासाठीं त्यांच्यावर कडाडून टीका केली असली तरी त्यांच्या मृत्यूनंतर टिळकांनीं स्वतःच त्यांचा गौरव गाइलेला आहे. तो गौरव करतांना टिळकांनीं जी दृष्टि स्वीकारली होती, त्याच दृष्टीनें टिळकांच्या प्रतिपक्षीयांबद्दल टिळकांच्या आजच्या चरित्रलेखकांनीं विवेक बाळगावयास पाहिजे. श्री. ताम्हनकरांनीं असा विवेक बाळगलेला नाहीं. यामुळें त्यांनीं लिहिलेलें चरित्र 'अधिकृत' या नात्यानें लोकांमध्यें मान्यता न पावल्यास आश्चर्य वाटायला नको. श्री. रामगोपाल यांच्या बाबतींत ज्या चुका क्षम्य ठरतील तसल्या चुका श्री. ताम्हनकरांच्या संबंधांत क्षम्य गणल्या जाणार नाहींत. पान ११७ मध्यें सार्वजनिक काकांच्या नांवाचीं आद्याक्षरें जे. व्ही. जोशी याप्रमाणें दिलेलीं आहेत व त्यांची अव्वल दर्जाचे आकडेशास्त्री अशी योग्यता वाखाणली आहे. आद्याक्षरांसारखीच ही वाखाणणी चुकीची आहे. अव्वल दर्जाचे आकडेशास्त्री कै. गणेश व्यंकटेश जोशी होते. सार्वजनिक काका आंकडेशास्त्राचे प्रकाण्ड पंडित म्हणून कधीच प्रसिद्ध नव्हते. हें पुस्तक इंग्लंडमध्यें छापलें जाऊन देखील मजकुराच्या छपाईत चुका दृष्टीस पडतात. चित्रांची छपाई फार तर उत्तम ठरण्याला हरकत नाहीं. श्री. करमरकरांनीं पं. नेहरूंच्या भाषणाचा उतारा घेऊन थोरामोठ्यांच्या पुरस्काराची उणीव भरून काढली तर श्री. ताम्हनकरांनीं पंडितजीच्या बहिणीकडून (श्री. विजयालक्ष्मी पंडित) पुरस्कारपर अभिप्राय मिळविला. पुरस्कारांत चरित्रविषयाचें ज्ञान नसलें तरी चालतें. टिळकांनीं मराठी वाङ्मयाला 'गीतारहस्य' ग्रंथाची एकच एक भरीव देणगी दिली. परंतु श्री. पंडितबाईनीं गीतारहस्यासारखे आणखी कांहीं ग्रंथ टिळकांनीं लिहिल्याची कल्पना गोवली आहे. टिळकचरित्रासंबंधांत आणखी पुष्कळच लिहावयाचें असल्यानें येथें ज्यांचें निरीक्षण केलें, त्या तिन्ही पुस्तकांत श्री. करमरकरांचें पुस्तक उत्तम असल्याचें नमूद करून तूर्त लेखणी आवरणें भाग आहे.



अनुक्रमणिका

प्रा. बाळ गाडगीळ

# आर्थिक विषमता : दोन विचार

भारताच्या दुसऱ्या पंचवार्षिक योजनेचें एक महत्त्वाचें उद्दिष्ट उत्पन्न आणि संपत्ति यांच्या वाटणींतील विषमता जमेल तेवढी नाहींशी करणें हें आहे. उत्पन्नांतील विषमता नाहींशी झाली तरच राजकीय आणि सामाजिक समतेला अर्थ येतो; उत्पन्नाप्रमाणेंच उत्पन्नाचें मूळ जी संपत्ति तिच्या वाटणींतील विषमताहि नष्ट व्हावयास पाहिजे. आजचीं लोककल्याण राज्यें ( Welfare States ) या दृष्टीनें महत्त्वाचे प्रयत्न करीत आहेत. तीव्र स्वरूपाची आर्थिक विषमता नसावी या बाबतींत बहुतेकांचें एकमत आहे. परंतु या विचारांतून आणखी कांहीं महत्त्वाचे प्रश्न निर्माण होतात. त्यांतील कांहीं प्रश्नांचा विचार येथें करावयाचा आहे.

एक म्हणजे उत्पन्न आणि संपत्ति यांच्या वाटणींत समता निर्माण करणें हें उद्दिष्ट आर्थिक दृष्ट्या मागासलेल्या समाजानेंहि ( प्रगत समाजांप्रमाणेंच ) ठेवणें हें कितपत युक्त आहे ? दुसरें म्हणजे आर्थिक विषमता नसावी हें तत्त्व केवळ नीति किंवा न्याय किंवा मानवता या संबंधींच्या विचारावरच आधारलेलें आहे काय ? या दोन प्रश्नांचीं उत्तरें शोधूं लागल्यास त्यांतून आणखी कांहीं महत्त्वाचे प्रश्न निर्माण होतात.

## मागासलेल्या देशांतील आर्थिक विषमता

कित्येक भांडवलदार आणि विचारवंत यांचा आर्थिकदृष्ट्या अप्रगत असलेल्या देशांत आर्थिक विषमता नष्ट करण्यास मोठा विरोध असतो. त्यांचे मतें अशी विषमता नष्ट करणें म्हणजे विकासाला खीळ घालण्यासारखें आहे. मुळांतच संपत्ति एकंदर कमी. तेथें समता निर्माण करायची म्हणजे दारिद्र्याची समान वाटणी ( Redistribution of poverty) करण्यासारखें आहे. या लोकांच्या मतें आर्थिक विषमता ही खरोखर अशा परिस्थितींत उपकारकच ठरते. कारण जास्त संपत्ति आणि उत्पन्न ज्यांच्या हातांत केंद्रित झालेलीं असतात असे लोकच बचत करूं शकतात, आणि ही बचतच गुंतवणीसाठीं आणि विकासासाठीं उपयोगी पडते. समतेचें धोरण निर्माण करणें म्हणजे या ( त्यागी ) लोकांच्या हातून संपत्ति आणि उत्पन्न मोठ्या प्रमाणांत हिरावून घेणें आहे. बरें, अशा रीतीनें मिळालेलें उत्पन्न विकासासाठीं गुंतविलें जात असतें तर वेगळें. पण तसेंहि होत नाहीं. कारण समता निर्माण करण्याचा दुसरा उपाय म्हणजे कर किंवा इतर प्रकारांनीं मिळालेला हा पैसा गरीब जनतेवर खर्च करणें हा आहे. गरीब जनतेवर हा पैसा खर्च झाला तर तो विकासाच्या कारणीं लागेल हें अशक्य आहे. कारण, या लोकांचीं उत्पन्नें अगोदरच कमी असल्यामुळें वाढलेलें उत्पन्नहि ते खर्चच करतील. त्यामुळें गुंतवणीसाठीं आवश्यक अशी बचत निर्माण होणें सुतराम अशक्य आहे. ही अडचण या लोकांना वस्तू अगर सेवा ( Services ) देऊन सुटत नाहीं. कारण शेवटीं ज्यांना हे पैसे मिळतात तेहि बचत करण्याच्या दृष्टीनें तेवढे समर्थ नसतात. सारांश अप्रगत देशांत वरील उपाययोजना करणें म्हणजे सोन्याचीं अंडीं देणारी कोंबडी मारण्यासारखें आहे. दुसरें असें कीं, गरीब लोकांच्या हातांत हा पैसा खर्च होण्याची खात्री असल्यामुळें त्यांतून भाववाढ, चलनवाढ व तत्सम धोके उद्भवतील. वस्तूंचा तुटवडा असल्यामुळें असें होणें साहजिकच आहे.

हीं मतें प्रतिपादन करणारे लोक सरकारी करविषयक धोरणावर कडाडून टीका करतांना आढळतात. कुठल्याहि कॉमर्स चेंबरमध्यें होणारीं भाषणें, भांडवलदार किंवा त्यांचीं मुखपत्रें किंवा त्यांचे प्रतिनिधी यांचीं भाषणें अगर लेख पाहिले असतां हीं मतें त्यांतून वारंवार प्रदर्शित केलेलीं दिसतात.



अनुक्रमणिका

हीं मतें पडताळून पाहिलीं असतां त्यांतून काय दिसतें ? पहिला महत्त्वाचा मुद्दा असा कीं आजच्या लोककल्याण राज्यांतील कराचें प्रमाणहि भासविलें जातें तितकें जास्त नाहीं. इतर देशांच्या कराच्या प्रमाणाकडे पाहतांहि हें दिसून येतें. भारतांतील कित्येक अर्थशास्त्रज्ञांच्या मतें आपल्याकडील करप्रयत्न ( tax effort ) हा आपल्या महत्त्वाकांक्षी विकास-धोरणाला साजेसा नाहीं. परकीय मदत, ( परकीय सरकारची किंवा आंतरराष्ट्रीय संस्थांची ) सार्वजनिक कर्जें, किंवा चलनवाढ या मार्गांनीं आपले प्रश्न सोड-विण्याऐवजी करप्रयत्न वाढवूनच ते सोडविले पाहिजेत असें हे तज्ज्ञ म्हणतात. परकीय मदतीबद्दल खात्री कांहींच देतां येत नाहीं. तसेंच परकीय मदतींत आणि सार्वजनिक कर्जांत परतफेड आणि व्याजाचा बोजा या महत्त्वाच्या अडचणी आहेत. मोठ्या प्रमाणावर चलनवाढ जितकी सोपी तितकीच ती धोक्याची आणि म्हणून त्याज्य होय. याउलट करांतून मिळालेला जो पैसा आहे त्यांत चलनवाढीचा धोका नाहीं, परतफेडीची अगर व्याजाची अडचण नाहीं आणि इतर फायदे आहेत. आपल्याला मोठ्या प्रमाणावर विकास साधायचा असेल तर त्याची किंमतहि तशीच जबर देण्याची आपली तयारी पाहिजे.

कराचा बोजा स्वाभाविकपणें वाढत गेला असला तरी तो निरुत्साह ( disincentive ) निर्माण करण्याइतका झाला आहे असें दिसत नाहीं. एकतर बिनसरकारी विभागाकडून ( private sector ) केलेल्या अपेक्षा पुऱ्या होत आहेत. दुसरें म्हणजे प्रो. कॅल्डॉर या ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञानें म्हटल्याप्रमाणें प्राप्तिकराचा बोजा वरच्या पातळ्यांवर जरी जास्त होता तरी इतर कित्येक प्रकारचें उत्पन्न कराशिवाय निसटूं शकत होतें. याशिवाय प्राप्तिकर जरी जास्त होता तरी तो संपूर्ण दिला जात होता असें नाहीं. चुकविल्या जाणाऱ्या कराचा अंदाज प्रो. कॅल्डॉरनें कोट्यवधि रुपयांत केला होता आणि आपल्या अर्थमंत्र्यांनीहि तो कांहीं प्रमाणांत मान्य केला होता हें महत्त्वाचें आहे. प्राप्तिकरामुळें अगदीं वरच्या-पातळींत रुपयाचा ९२% भाग करांत जात असे. म्हणजे येथें एक रुपयावरचा कर चुकविणें याचा अर्थ ९००% पेक्षांहि जास्त फायदा मिळविण्याची संधि असते. त्यामुळें तनमनधनेंकरून हे लोक कर चुकविण्याच्या मागें लागतात आणि कर चुकविणें ही एक कला ( fine art ) बनते. कर चुकविणें हें कायदेशीर पद्धतीनेंहि शक्य होतें. उदाहरणार्थ, वस्तूंच्या किंमती वाढवून कर ग्राहकाकडून वसूल करतां येतो. विशेषतः जेथें वस्तूंचा तुटवडा असतो अशा परिस्थितींत हें जमतें. या शिवाय कराचा वाढता बोजा हा सर्वच्या सर्व उत्पन्नाच्या वरच्या पातळ्यांतील लोकच वाहतात असें नाहीं. विशेषतः वस्तूंवर लादण्यांत येणारे जे कर आहेत ( sales taxes ) त्यांच्या उत्पन्नाचें प्रमाण फार मोठें आहे. ( दारूबंदी केल्यामुळें दारूवरील करांची कोट्यवधि रुपयाची तूट या करांनीं भरून काढावी लागते. ) हे कर मुख्यतः आवश्यक वस्तूंवर लादले जात असल्यामुळें त्यांचें वजन गरीबश्रीमंतावर सारखेंच पडतें. असे विषम स्वरूपाचे कर ज्या प्रमाणांत आहेत त्या प्रमाणांत करभार हा कमी उत्पन्न अस-लेले लोकहि सहन करतात हें स्पष्ट आहे.

भांडवलदार वर्गाचे आक्षेप अनेक दृष्टींनीं कसे फोल आहेत हें पाहिलें. पण सर्वांत महत्त्वाचा मुद्दा याहूनहि वेगळा आहे. क्षणभर आपण असें समजूं कीं, कराचा बोजा हा खरोखरच मोठा आहे; त्यामुळें उत्पन्न आणि बचत हीं खरोखरच कमी होतात; व त्यामुळें गुंतवणीला पैसाहि उरत नाहीं आणि उरला तरी यावरचें उत्पन्न करापोटीं वाया जाणार म्हणून हे लोक निरुत्साही बनतात. असें गृहीत धरलें तरी-सुद्धां हें आर्थिक विषमता टिकविण्यासाठीं पुरेसें कारण आहे काय ? आर्थिक विषमतेमुळें जरी गुंतवण होण्यास मदत होत असली तरी तिच्यामुळें निर्माण होणारे जे दुसरे दोष आहेत त्यांकडे डोळेझांक करून चालणार नाहीं. आर्थिक विषमता

असली तर सामाजिक समता आणि राजकीय समता या संज्ञांना कांहींच अर्थ रहात नाहीं. उत्कर्षाच्या, विकासाच्या संधि फक्त धनिकांना मिळतात, इतरांना मिळत नाहींत किंवा निदान योग्य प्रमाणावर मिळत नाहींत. आर्थिक सत्तेच्या जोरावर राजकीय सत्ता मिळवितां येऊन तिच्या साहाय्यानें आर्थिक सत्ता दृढ करतां येते. आर्थिक विषमतेचे राजकीय आणि सामाजिक दुष्परिणाम आपण जाणतो. आणि या कारणांकरितांच आर्थिक विषमतेवर हल्ला करतो. हे दुष्परिणाम लक्षांत घेतले म्हणजे तिच्यांतून भांडवल निर्माण होतें हा तिचा गुण आहे म्हणून ती टिकविली पाहिजे हें विधान अगदीं दुबळें वाटतें. विषमता दुसऱ्या कुठल्याहि कारणांसाठीं हवी असो भांडवलपुरवठ्यासाठी ती टिकवून धरूं पाहणें हें बरोबर नाहीं.

खाजगी भांडवलावर नेहमीं विश्वासानें अवलंबून राहणें हें तरी कितपत बरोबर आहे ? स्वाभाविकपणेंच खाजगी भांडवलदारांचा हेतू खूप फायदा आणि तोहि लवकर मिळविण्याचा असतो. अशा लोकांना विकासाच्या कार्यापेक्षां वायदे, सट्टे यांचें आकर्षण जास्त असणें साहजिक आहे. विकासकार्य ज्यामुळें होईल अशा धंद्यांबद्दल त्यांना आस्था वाटेलच असें सांगतां येत नाहीं. विकासाला आवश्यक असे जे धंदे आहेत आणि ज्यांत फायदा कमी, उशिरा मिळणारा व अनिश्चित स्वरूपाचा आहे अशा धंद्यांकडे हे लोक फिरकतील असें यांच्यांत कांहींच आकर्षण नाहीं. शिवाय खाजगी भांडवल पुरवठ्याचें स्वरूप अनिश्चित आणि देशाच्या दृष्टीनें पाहतां योजनाहीन असूं शकतें.

येथें आपणांस सरकारी पातळीवरून होणाऱ्या गुंतवणीचें महत्त्व लक्षांत येतें. या गुंतवणींत खाजगी फायद्याचा प्रश्न नसतो. बेताचा फायदा आणि तो धीरेधीरे मिळाला तरी चालतो. शिवाय येथें योजनाबद्ध गुंतवण होण्याची शक्यता जास्त असते. म्हणजे खाजगी भांडवलानें गुंतवण न केल्यामुळें निर्माण होणारी उणीव सरकार जास्त क्षमतेनें भरून काढील असें म्हणतां येतें. (अर्थात् येथें सरकारी यंत्रणा ढिली; उधळी, अक्षम नाहीं असें गृहीत धरलें आहे. हे दोष सरकारी यंत्रणेंत असावेत असा कांहीं नियम नाहीं. प्रयत्नपूर्वक ते नष्ट करतां यावे. )

वरील विवेचनावरून आपल्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर मिळतें. तें म्हणजे आर्थिक समता निर्माण करण्याचें ध्येय प्रगत समाजांप्रमाणेंच आर्थिकदृष्ट्या मागासलेल्या समाजांनींहि ठेवण्यांत कांहींच चूक नाहीं. मात्र यामुळें सरकारी यंत्रणेवर येणारी नवी जबाबदारी येथें विसरतां येत नाहीं. ही नवी जबाबदारी यशस्वीरीत्या पार पाडण्याइतकी ही यंत्रणा कार्यक्षम व्हावयास पाहिजे.

## विषमता नष्ट करण्याचे हेतू

विशेषतः औद्योगिक क्रांतीपासून निर्माण झालेली आर्थिक विषमता अनेक विचारवंतांना खुपलेली आहे. ... " The destruction of the poor is their poverty and the study of the causes of poverty is the study of the causes of the degradation of a large part of mankind." असें प्रो. मार्शलनें आपल्या ग्रंथांत लिहिलें. आणि त्याचे शिष्य प्रो. पिगू यांच्यापासून तर Welfare Economics ही अर्थशास्त्राची एक नवी शाखाच अस्तित्वांत आली. प्रो. पिगू यांनीं आर्थिक विषमतेवर स्वतंत्र ग्रंथरचनाहि केली आणि तिचे दोष उघड केले.

पण या सर्वांच्या लेखनांत आर्थिक विषमतेविरुद्ध बाजू ही बहुधा नीति, किंवा न्याय किंवा मानवता इत्यादि तत्त्वांवर आधारून मांडलेली आहे. नैतिकदृष्ट्या पाहतां अशी विषमता समाजांत असूं नये हें सहज मान्य व्हावें. परंतु आर्थिक समता निर्माण करण्याच्या या उद्दिष्टाला केवळ नीतितत्त्वांचाच आधार नाहीं तर आर्थिकदृष्ट्याहि त्याला महत्त्वाचा आधार आहे हें येथें पहावयाचें आहे.

प्रगत समाजांच्या दृष्टीनें पाहतां वरील विधानाची सत्यता सहज लक्षांत येते. वृत्ति (employment) ही पैशाचें पाठबळ असलेल्या मागणीवरून (effective demand) ठरतें. मागणी असली तरच वस्तू योग्य किंमतीला, योग्य फायदा घेऊन विकतां येतात. व असें असतें म्हणूनच श्रमशक्तीला मागणी येऊन वृत्ति (employment) टिकून राहते. मागणी जर कमी झाली तर आपोआपच उत्पादनाच्या किंमती उतरतील, फायदा कमी होईल आणि उत्पादन कमी होऊन त्यामुळें श्रमशक्तीची मागणी घटेल व बेकारी वाढेल.

समाजांत उत्पन्नाच्या वरच्या पातळीमध्यें असणारे जे लोक असतात त्यांचें खर्चाचें प्रमाण बरेंच स्थिर असतें. आवश्यक तेवढा खर्च करण्याइतकें पैसे त्यांच्याजवळ अगोदरच असतात. त्यामुळें उत्पन्न वाढल्यास खर्च वाढेल, मागणी वाढेल असें या धनिक वर्गाच्या बाबतींत शक्य नाहीं. या उलट समाजांतील जो गरीब लोकांचा वर्ग आहे त्यापैकीं बहुसंख्यांचें उत्पन्न इतकें कमी असतें कीं त्यांना कित्येक आवश्यक वस्तूहि योग्य त्या प्रमाणांत घेतां येत नाहींत. सारांश, यांचीं उत्पन्नें वाढलीं तर ती सर्व खर्च होणार हें स्पष्ट आहे. उत्पन्नाची फेरवांटणी झाली म्हणजे श्रीमंत वर्गाकडचा (बचत करणारांचा किंवा ज्यांचा खर्च वाढत नाहीं अशा लोकांचा) पैसा गरीब वर्गाकडें (ज्यांना खर्चासाठीं पैसा हवा आहे) त्यांच्याकडे जाईल. त्यांनीं जो एरवीं खर्च झाला नसता तो हा पैसा खर्च केला व वस्तूंना नवी मागणी निर्माण केली कीं त्यामुळें जें उत्पादनचक्र एरवीं थंडावलें असतें तें वेगानें फिरूं लागेल. उत्पादन-वृत्ति (employment) उत्पन्न, राहणीचा दर्जा इत्यादि त्यामुळें वाढतील.

अर्थरचनेंतील उत्पन्नाची पातळी टिकविण्यासाठीं किंवा वाढविण्यासाठीं आर्थिक स्थैर्य व प्रगति करण्यासाठीं उत्पन्नाची फेरवांटणी करून नवी मागणी निर्माण केली पाहिजे हें यावरून दिसतें. या विवेचनांत कुठल्याहि नीतितत्त्वाचा किंवा मानवतेच्या मूल्याचा आधार घेतलेला नाहीं. या तत्त्वांचा आधार घेतला असतां आर्थिक विषमतेविरुद्धची बाजू जास्त बळकट होत असेल. पण विषमता नष्ट करण्यास या तत्त्वांचा आधार हवाच असें नाहीं. केवळ समाजाची आर्थिक घडी टिकविण्याण्याच्या दृष्टीनें आणि व्यापारचक्रासारखे (Business cycles) उत्पात टाळण्यासाठीं म्हणजे केवळ आर्थिक तत्त्वावर आर्थिक विषमता नष्ट करणें आवश्यक आहे हें स्पष्ट होतें.

जें तत्त्व आर्थिक दृष्टया विकसित झालेल्या देशांच्या बाबतींत खरें आहे तें विकासाच्या मार्गावर असलेल्या देशांच्या बाबतींतहि खरें आहे काय ? या विषयावर विशेष संशोधन झालेले नाहीं. म्हणून या बाबतींत निश्चित स्वरूपाचीं अशीं विधानें करणें अवघड आहे. परंतु खालील कांहीं मुद्यांवर विचार होणें शक्य आहे.

अविकसित देशांच्या बाबतींतहि वरील विवेचन खरें आहे—निदान कांहीं प्रमणांत तरी—असें वाटतें. वरवर पाहतां हें कोणाला बरोबर वाटणार नाहीं. कोणी असें म्हणेल कीं मागासलेल्या देशांतील स्थिति ही अगदीं वेगळी असते. तेथें उत्पादनच कमी असतें (उत्पादन कमी असल्यामुळेंच हा देश मागासलेला असतो). त्यामुळें मागणी किंवा क्रयशक्ति वाढल्यास त्यामुळें भाववाढ होण्याचा धोका निश्चित असतो. हें जरी कांहीं अंशीं खरें असलें तरीहि मागासलेल्या देशांत सरळसरळ चलनवाढ करूनहि योजनेसाठीं पैसा निर्माण केला जातो. भारताच्या दुसऱ्या पंचवार्षिक योजनेपैकीं —४८०० कोटी रुपयांपैकीं — २५% म्हणजे १२०० कोटी रुपयांचा खर्च नवी चलन निर्मिती करून व्हावयाचा आहे. अशा पद्धतीनें खर्चाचा पैसा निर्माण करणें हें कित्येकांना पसंत नाहीं. उदाहरणार्थ प्रो. शेनॉय् हे या पद्धतीवर कडाडून हल्ला करतात. पण शेनॉय् यांच्यामतें सुद्धां १२० कोटी रुपयांपर्यंत चलन निर्मितीचा आधार घ्यायला कांहीं हरकत नाहीं.



अनुक्रमणिका

याचा अर्थ असा कीं कर, कर्जें आणि परकीय मदत यांमधून मिळणारा पैसा हा अपुराच असतो आणि ही तूट दुसऱ्या मार्गांनीं भरून काढावी लागते. असें जर केलें नाहीं तर विकास होणें हें कित्येकदां अशक्य होण्याचा संभव आहे. वाढती क्रयशक्ति ही विकास पावणाऱ्या रचनेंत सामावून जाते एवढेंच नव्हे तर ती तेथें कांहीं प्रमाणांत आवश्यकहि असते. निदान सरळसरळ चलननिर्मिती जेथें चालू शकते तेथें उत्पन्नाच्या फेरवांटणीमुळें क्रयशक्ति वाढेल अशी तक्रार होऊं नये.

मोठ्या प्रमाणावर व योजनाबद्ध विकास करावयाचा म्हणजे निधिनिर्मितीचे नेहमीचे उपाय उपयोगी पडणार नाहींत; तेथें चलननिर्मितीचाहि अवलंब करावा लागतो. हें जितक्या प्रमाणांत खरें आहे तितक्या प्रमाणांत उत्पन्नाच्या फेरवांटणीला आक्षेप असू नये.

मागासलेल्या व विशेषतः लोककल्याणाचें ध्येय बाळगणाऱ्या राज्यांत आर्थिकेतर कारणांचाहि आधार उत्पन्नाच्या फेरवांटणीसाठीं मिळूं शकेल. विशेषतः आपल्या द्वितीय पंचवार्षिक योजनेप्रमाणें दीर्घ मुदतीनें पुरीं होणारीं विकासकार्यें जेथें हातीं घेतली असतील तेथें बव्हंशी गरीब जनतेला वाढत्या उत्पादनाचा वाटा मिळत नाहीं. मोठमोठाल्या विकासयोजनांवरील खर्चामुळें ( ताबडतोब उत्पादनांत भर पडत नसल्यामुळें ) मालाच्या किंमती हटकून वाढतात. व त्यामुळें कमी उत्पन्नें असणाऱ्या लोकांची प्रत्यक्ष क्रयशक्ति कमी होतें. त्याच रकमेंत त्यांना आतां कमी वस्तूंवरच समाधान मानावें लागतें. वरच्या पातळींतील लोकांना ही घस इतक्या प्रमाणावर सोसावी लागत नाहीं. हें अर्थात् अन्यायाचें आहे. पण एका दृष्टीनें पाहतां ते आर्थिक बाजूनेंहि बरोबर नाहीं कारण गरीब लोकांची जर अशी गळचेपी झाली तर त्यांच्या उत्पादनक्षमतेवर प्रतिकूल परिणाम होणें अगदीं शक्य आहे. आणि त्यामुळें उत्पादनाची पातळी खाली जाण्याचा धोका आहे.

या चर्चेवरून मागासलेल्या व विशेषतः प्रगत देशांतील आर्थिक विषमता नष्ट करण्याच्या दृष्टीनें केवळ आर्थिक कारणेंहि पुरेशीं आहेत हें लक्षांत यावें.

आतां शेवटचा एकच मुद्दा तो म्हणजे मागासलेल्या देशांत करावयाच्या उत्पन्नाच्या फेरवांटणीबद्दल. उत्पन्न आणि संपत्ति यांवरील कर आणि गरीबांचें शिक्षण, आरोग्य यांवरील खर्च या मार्गांनीं हें होऊं शकेल. पण याशिवाय या बाबतींत एक नवीन विचार असा कीं दीर्घ मुदतीच्या विकासयोजनांवर जो खर्च होतो त्यामुळें निदान कांहीं प्रमाणांत तरी उत्पन्नाचें फेरवांटप होत असतें. हें कसें ?

दीर्घ मुदतीच्या विकासयोजनांवर ( धरणें, वीज केंद्रें कालवे इ. ) जो खर्च होतो त्यामुळें ताबडतोब उत्पादनांत भर पडत नाहीं हें पाहिलें. हा पैसा जो खर्च होतो त्यामुळें कित्येक बेकार लोकांना काम मिळते, कित्येकांचे पगार वाढतात. जितक्या प्रमाणांत उत्पन्नाच्या खालच्या पातळीवरील लोकांची क्रमशक्ति वाढते तितक्या प्रमाणांत उत्पन्नाच्या वरच्या पातळीवरील लोकांची वाढत नाहीं. ( हे लोक संख्येनेंहि कमी असतात. ) यामुळें स्थिर उत्पादन विकत घेण्यासाठीं सर्वांची स्पर्धा सुरू होते. जितक्या प्रमाणांत वरील पातळीच्या लोकांना जास्त किंमती द्याव्या लागतात व खालच्या पातळीच्या लोकांना वस्तू विकत मिळतात तितक्या प्रमाणांत उत्पन्नाचें फेरवांटप होतें असें म्हणवयास हरकत नाहीं. परंतु अशा पद्धतीनें विषमता नष्ट होण्याशिवाय ती नष्ट करण्याचे प्रत्यक्ष उपायहि योजावयास पाहिजेत. अविकसित देशात उत्पादनक्षमता (productive efficiency) वाढविण्यच्या दृष्टीनें आणि नवीन हुरूप, उत्साह (incentive) निर्माण करण्याच्या दृष्टीनें उत्पन्नाच्या फेरवांटणीस अतिशय महत्त्व आहे.



अनुक्रमणिका

श्री. पन्नालाल सुराणा

# जुन्यांचा 'नवा' विरोध

आगरकरांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, "तरुण हे समाजनौकेचीं शिडें होत; तर वृद्ध हे भरताड होत." शिडांमुळें नांवेला गति मिळते; पण त्या गतीच्या वेगांत नौका फार हिंदकाळूं नये यासाठीं भरताडाची गरज असते. पण म्हणून भरताडांनी नावेच्या तळालाच भोकें पाडण्याचा किंवा तळाशीं असलेले जडजड नांगर उचलून समुद्रांत टाकण्याचा खटाटोप सुरूं केला तर कांहीं भरताडाला जलसमाधि देण्यावांचून गत्यंतर उरत नाहीं.

पुरेसा गाजावाजा करून भारताच्या राजकीय रंगभूमीवर प्रवेश करणाऱ्या स्वतंत्र पक्षानें आपल्याकडे या भरताडाची भूमिका घेण्याचा आव आणला आहे. कॉंग्रेसच्या समाजवादी घोषणामुळें आतां भारताचें तारू शासनसंस्थेची भांडवलशाही या खडकावर आदळून फुटणार अशी जबरदस्त भीति या 'स्वतंत्र' नेत्यांना वाटूं लागली आहे. आणि म्हणून समाजाला स्थैर्याचा दिलासा देण्यासाठीं त्यांनीं मुंबई अधिवेशनांत आपला एकवीस-कलमी कार्यक्रम जाहीर केला आहे.

या आधीं गेल्या जूनच्या पहिल्या आठवड्यांत मद्रास येथें अखिल भारतीय किसान फेडरेशनच्या पुरस्कारानें एक अधिवेशन भरलें होतें. त्यावेळचीं श्री. राजाजी व श्री. मिनू मसानी यांचीं भाषणें, अठरा-कलमी कार्यक्रम व श्री. मसानींचा ता. ६-६-५९ च्या टाईम्स ऑफ इंडियांतील लेख, आणि ता. ९-८-५९ ची श्री. मुन्शींची दिल्ली येथील पत्रकारांना मुलाखत—या सर्व साहित्यांतून या पक्षाची भूमिका बरीचशी स्पष्टणें कळूं शकते.

## नवा राजकीय पक्ष कितपत आवश्यक आहे ?

राजाजींच्या भाषणाचा मुख्य भर याच्यावर आहे की भारतीय राजकारणांत आज नव्या स्वरूपाच्या विरोधाची गरज आहे. संसदीय लोकशाहींत जुन्या-नव्या विरोधाचें नेहमीं स्वागतच केलें पाहिजे. चुकीची धोरणें किंवा अर्धवट वा प्रतिगामी कायदे यांच्यापासून खऱ्या समाज हिताचें रक्षण करण्यासाठीं सरकारच्या ध्येयधोरणाबद्दल समाजांत जागरुकता असावी लागते. वृत्तपत्रें, सभा-निदर्शनें, निरनिराळे संघमंडळया, व राजकीय पक्ष यांच्या मार्फत चालूं राजकारणाबद्दलचें लोकमत प्रकट होत असतें. सरकारच्या धोरणांना किंवा कारभाराला या मार्गांनीं विरोध होत असतो. अर्थात् समाजांतील प्रत्येक वर्गाचें किंवा थराचें पुरेसें प्रतिनिधित्व या मार्गांनीं होतेंच असें नाहीं. पण ज्यांना असें वाटतें कीं एखाद्या अमुक एका हितसंबंधाची उपेक्षा होते आहे तेव्हां त्यांनाहि हे मार्ग खुले असतात. या मार्गांनीं वाटेल तितकें लोकमत संघटित करतां येतें. त्यासाठीं नवा राजकीय पक्षच काढण्याची गरज असते असें नाहीं.

कारण राजकीय पक्ष हा एका विशिष्ट राजकीय विचारप्रणालीवर आधारलेला असला पाहिजे. सतत विरोध करीत राहणें हा त्याचा कार्यक्रम होऊं शकत नाहीं. प्रस्थापित राजकीय पक्षाला पर्यायी पक्ष बनण्याची त्याची तयारी असली पाहिजे; व त्यासाठीं समाजाला जास्त आकर्षक वाटेल असा पर्यायी कार्यक्रम त्या पक्षानें सुचविला पाहिजे.

स्वतंत्र पक्षाबद्दलचें उपरोक्त सर्व साहित्य वाचल्यानंतर असा ग्रह होतो कीं हा पक्ष स्थैर्यालाच

जास्त प्राधान्य देतो आहे. त्या पक्षाचें म्हणणें असें कीं, शासनसंस्था हें एक दुश्चिन्ह आहे, त्याचें कार्य-क्षेत्र शक्य तितकें मर्यादित ठेवावें, 'कुटुंब व शेत हें सर्व प्रकारच्या निर्बंधांपासून मुक्त असावे,' तरच समाजाला खऱ्या स्वातंत्र्याचा लाभ होईल व त्यांतूनच समाजाची प्रगतीहि साधेल. या प्रतिपादनाचा आजच्या भारतीय राजकीय संदर्भात "जैसे थे" चा पुरस्कार असाच अर्थ होतो.

'जैसे थे'चा पुरस्कार भारतीय जनतेला आकर्षक वाटेल काय? आजच्या आपल्या राजकीय मानसाची ओढ आहे बदलाकडे. आपणाला त्वरित व मौलिक बदल पाहिजे आहे; समाजजीवनाच्या सर्व क्षेत्रांत क्रांति व्हायला हवी आहे. गेल्या दीडशें वर्षांत निरनिराळ्या सुधारकांनीं व विचारवंतांनीं असें सांगून ठेवलें आहे कीं, आपलें राजकीय व सामाजिक जीवन मागासलेलें आहे. खरा उत्कर्ष साधायचा असेल तर या क्षेत्रांत आमूलाग्र बदल घडवून आणला पाहिजे. आर्थिक क्षेत्रांतलें आपलें मागासलेपण ही तर प्रचार करून पटविण्याची बाबच नव्हती. परकीयांनीं आपलेवर दास्य लादलें तेंच त्यांच्या आर्थिक उत्कर्षाच्या जोरावर. त्यांच्या स्पर्धेमुळें आपले उद्योगधंदे बसले हें प्रत्येकाला जाणवत होतें. याच बरोबर नव्या विज्ञानाच्या आधारें आपल्यालाहि आर्थिक विकास साधतां येईल याचीहि जाणीव होऊं लागली होती. पण हें सर्व करण्यासाठीं राष्ट्रीय स्वातंत्र्याची गरज आहे असें सांगितलें जात होतें. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर सर्वांगीण प्रगतीचा कार्यक्रम हातीं घेतां येईल; एवढेंच नव्हे तर स्वराज्यांत शेतकरी-कामगारांना न्याय मिळेल, त्यांची स्थिति सुधारेल असेंहि म. गांधी व समाजवादी मंडळींनीं आपापल्या परीनें सांगितलें होतें.

म्हणून स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारतीय जनतेला आतां त्वरित मूलगामी बदल पाहिजे आहे. स्वातंत्र्य-लढ्यांतील कांहीं नेते आतां सरकारांत असल्यानें सरकारनें आतां हें स्वप्न ताबडतोब साकार केलें पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे.

या बदलाची घाई लागण्याचें दुसरें कारण असें कीं, आपल्या उत्तरेकडल्या शेजाऱ्यानें याच काळांत मोठी आघाडी मारल्याचें समक्ष दिसतें आहे. १९४९ सालीं चीन आपल्यापेक्षां जास्त मागासलेला होता. सर्वच बाबतींत त्यांना प्रतिकूलताच जास्त होती. असें असतांना जर चीननें एवढी प्रगति साधली, तिथल्या शेतकऱ्याला खायलाप्यायला जास्त मिळवून दिले तर मग भारतालाच तें कां अशक्य व्हावें हें भारतीय माणसाला समजत नाहीं.

## नव्या पक्षाची शेतीविषयक विचारसरणी

अशा लोकांसमोर "जैसे थे" चा कार्यक्रम ठेवण्यांत कोणता राजकीय शहाणपणा आहे? पण श्री. मसानी आणि मंडळींनीं तेंच करण्याचें ठरवलेलें दिसतें. कारण त्यांचें म्हणणें कीं, शेतीला हात लावूं नका; सहकारी शेतीच्या भानगडींत पडूं नका; आज शेत जमिनीची वांटणी विषम प्रमाणांत झाली आहे. शेत-मालकांपैकीं दहा टक्के मालकांकडे २८ टक्के जमीन आहे; नंतरच्या २० टक्के मालकांकडे ३० टक्के जमीन आहे; ४० टक्के असणाऱ्या मध्यम शेतकऱ्याच्या वांट्याला ३१ टक्के जमीन आली आहे, आणि शेवटच्या ३० टक्के शेतकऱ्यांना ११ टक्के जमिनींत भागवावे लागते. याशिवाय दीड कोटी भूमिहीन शेतमजूर कुटुंबें निराळींच. ५० किंवा ६० एकरवाला जमीनमालक आज मोठ्या प्रमाणावर सावकारी करूं लागला आहे. (रूरल क्रेडिट सर्वेच्या अंदाजाप्रमाणें ग्रामीण भागांतील एकूण कर्जपुरवठ्यापैकीं सुमारें ४४ टक्के कर्ज हें मोठ्या शेतकऱ्यांमार्फत पुरवलें जाते) उलट १॥ कोटी छोटे शेतकरी व १॥ कोटी शेतमजूर कुटुंबें यांना वर्षभर रोजगाराची हमी नाहीं; तेव्हां मीठ भाकरीची देखील भ्रांत पडत असणार हें उघड आहे. शेतीसुधारणेचा पहिला कार्यक्रम हा सीलिंग

बसविण्याचा व शेतीवर अवलंबून असणाऱ्या प्रत्येक कुटुंबाला किमान रोजगारीची हमी देण्याचाच असला पाहिजे. मसानीसाहेब किंवा रंगाजी-राजाजी म्हणतात 'तसें कांहीं करूं नका. शेताला हात लावूं नका!'

बरें, सरकारनें शेतीकडे अजिबात बघूं नये एवढें केल्यानें आपलें शेतीउत्पादन तरी वाढणार आहे काय? आपल्या शेतीची ज्याला तोंडओळख झाली आहे त्याला देखील हें चटकन समजतें कीं, मोठ्या प्रमाणावर व अनेक प्रकारची सरकारी मदत मिळाल्याशिवाय आपल्या शेतीची प्रगति होणार नाहीं. अगदी मोठा जमीन मालक सोडला तर बाकीच्या शेतकऱ्यांची शेतीसुधारणा करण्याची ऐपत नाहीं, आणि हा मोठा जमीन मालक बहुधा शहरांत वा इतर उद्योगधंद्यांत गुंतलेला असतो. हा वरच्याच हिशोबाप्रमाणें १० टक्के असलेला वर्ग सोडून दिला तरी बाकीच्या शेतकऱ्यांना सरकारी मदतीची निकड आहे. ५-६ एकरापेक्षां कमी जमीन असलेल्या शेतकऱ्याची शेती तर एकट्यानें केल्यास कधींच किफायतशीर होणार नाहीं. मग शेतींत आधुनिक तंत्र आणायचें, मोठ्या प्रमाणावर भांडवल ओतायचें तर त्यासाठीं कांहीं संस्थात्मक यंत्रणा उभारावी लागणें अपरिहार्य नाहीं का? संयुक्त सहकारी शेती ही देशाच्या सर्वच भागांत इष्ट ठरेल कीं नाहीं हा खरें म्हणजे अजून संशोधनाचाच प्रश्न आहे. पण सध्या कॉंग्रेस वा इतर पक्षांचा भर आहे सेवा सहकारी सोसायट्यांवर. आणि या बाबतींत शक्यतों सक्ति करूं नये असाच रोख दिसतो. मग शेतीसुधारणेसाठीं अशा प्रकारची सहकारी यंत्रणा उभारण्याला स्वतंत्र पक्षाचा विरोध कां असावा? बरें, हा मार्ग योग्य वाटत नसला तर दुसरा पर्याय कोणता? 'आहे तेंच ठीक आहे' हा काय पर्याय आहे?

सहकारी यंत्रणेंत आज सक्ति आणूं नये असें बोललें जात असलें तरी पुढेंपुढें, विशेषतः पंचवार्षिक योजनांतील उद्दिष्टें साध्य होत नाहींत असें दिसूं लागल्यावर नोकरशाही तर्फे सक्ति होण्याची शक्यता आहे हें अंशतः मान्य केलें पाहिजे. सहकारी यंत्रणेंत सरकारची भागिदारी असल्यावर नोकरशाहींत वाढ होणार हें उघड आहे. त्यांची संख्या वाढेल, तसेंच त्यांचे अधिकारहि वाढतील. त्यामुळें सहकारी सोसायटीचें कामकाज स्वतंत्रपणें (autonomously) चालणें कठीण होईल, व त्याप्रमाणांत व्यक्तिस्वातंत्र्याचा संकोच होण्याची भीति आहे हें खरें. पण यावर प्रतिशहाच्या स्वरूपाची उपाययोजना केली पाहिजे; हा धोका आहे म्हणून हा कार्यक्रमच अंगिकारूं नये असें म्हणून चालणार नाहीं.

## स्वतंत्र पक्षाचें उद्योगधंद्याबाबत धोरण

उद्योगधंद्यांच्या बाबतींतहि या नव्या पक्षाचें धोरण असेंच जुनाट व प्रतिगामी वाटतें. श्री. मिनू मसानींनीं तर चक्क अॅडॅम स्मिथचीच भूमिका घेतली आहे. ता. ६-६-५९ च्या टाईम्स मधील त्यांच्या लेखांतील हा उतारा पहा —

"Today industrial management forms the centre of a triangle of pressure exercised by the parties at the three angles – the worker, the investor and the consumer. Labour demands higher wages; capital asks for higher dividends; and the consumer requires better and cheaper goods. Management, to do its own job and survive, must take risk and try to meet all the three demands by using experience, enterprise and efficiency. The worker has the right to change his job or to go on strike; the investor the free-

dom to invest money where and when he pleases, and the consumer the freedom to buy or not to buy as he pleases. Through the exercise of these freedoms self-interest is turned into public interest. This is the path of economic democracy. There is no other." थोडक्यांत, आर्थिक व्यवहारांत अनिर्बंध स्पर्धा चालू दिली म्हणजे भांडवलदार, गिऱ्हाईक व मजूर यांचें स्वातंत्र्य तर अबाधित राहतेंच, शिवाय त्यांच्या परस्परविरुद्ध मागण्यांचा मेळ घालतांना औद्योगिक व्यवस्थापक वर्ग हा समाजाची आर्थिक प्रगति घडवून आणतो. या ' बाजाराच्या कायद्या 'ला आपला अंमल मुक्तपणें चालवितां यावा म्हणून सरकारनें उद्योगधंद्यावर कोणत्याहि प्रकारचीं बंधनें घालूं नयेत.

अठराव्या शतकांतील खुल्या व्यापाराच्या कल्पनेचा विसाव्या शतकांत एका माजी मार्क्सिस्टानें पुरस्कार करावा हें दृश्य करमणूक करणारें आहे खरें. भांडवलशाहीची अनिर्बंध स्पर्धा चालूं दिली तर ती खुली राहात नाहीं, थोड्याच अवधींत तिच्यावर मक्तेदारीचा पगडा बसतो, आर्थिक विषमता मोठ्या प्रमाणांत वाढते व विशेष म्हणजे समाजाचें आर्थिक जीवन हें मुठभर व्यक्तींच्या लहरीवर अवलंबून राहतें हा नव्या जगाचा म्हणजे अमेरिकेचा देखील अनुभव आहे. याची कांहींशी जाणीव झाल्यामुळें स्वतंत्र पक्षाच्या मुंबई अधिवेशनानें आपली भूमिका जरा मवाळ केली आहे. २१ कलमी कार्यक्रमांतील १० वें कलम म्हणतें कीं, पायाभूत उद्योगधंदे सरकारनें चालवावेत, बाकीचें क्षेत्र खाजगी उद्योगधंद्यासाठीं खुलें ठेवावें, जबरदस्त नफेखोरीवर निर्बंध घालावेत ...... पण कांही झालें तरी सरकारचें कार्यक्षेत्र या बाबतींत शक्य तितकें संकुचित असावें. संपूर्ण भांडवलशाहीवादी भूमिका घेण्याची लाज वाटून थोडे फॅशनेबल बनण्यासाठीं या पक्षानें कांही गोष्टी अर्धवटपणें मान्य केल्या असल्या तरी त्याचें खरें स्वरूप झांकून राहात नाहीं. किंवा निदान, औद्योगिक धोरणाबाबत या पक्षाच्या भूमिकेंत गोंधळ आहे एवढें तरी खास.

कोणत्याहि पक्षाचें औद्योगिक धोरण पुढील दोन प्रश्नांबाबत स्पष्ट असलें पाहिजे — आजच्या खाजगी उद्योगधंद्यांवर सरकारचें कितपत नियंत्रण असावें ? व देशाच्या औद्योगिकरणांत खाजगी उद्योगधंद्याचें स्थान काय असावें ? मजुरांच्या व गिऱ्हाइकांच्या दृष्टीनें आजच्या उद्योगधंद्यांवर कडक नियंत्रण असलें पाहिजे हें आतां स्पष्ट झालें आहे. रॉकेल, कापड, साखर—या सर्वांचा आपल्याला नुकताच फार कटु अनुभव आला आहे. तेव्हां कारखानदारांनीं फाजील नफेखोरी करूं नये व मजुरांच्या कल्याणाची काळजी घ्यावी असें नुसतें म्हणून भागणार नाहीं. त्या बाबतींत दीर्घकालीन खंबीर धोरण स्वीकारून त्याची कठोरपणें अंमलबजावणी केली पाहिजे. स्वतंत्र पक्षाला हें कितपत मान्य होईल तें त्यांनीं स्पष्टपणें सांगावें.

भावी औद्योगिकरणाबाबत तर खाजगी उद्योगधंद्यांकडून समाजहितदक्ष नेतृत्वाची अपेक्षा करणें वेडेपणाचेंच ठरेल. स्वातंत्र्यानंतरच्या काळांत नाहीं म्हटलें तरी खाजगी भांडवलशाहीला अनेक सवलती देण्यांत आल्या होत्या पण त्यांचा फायदा करून या क्षेत्रानें कांहीं विशेष कर्तृत्व दाखवलें आहे असें मुळींच नाहीं. श्री. मुन्शी म्हणतात कीं, आपण पश्चिम जर्मनी व इटालींतील खाजगी भांडवलदारीचें उदाहरण डोळ्यांसमोर ठेवावें. प. जर्मनीनें नुकतेंच युरोपीय बाजारपेठेंत इंग्लंडला देखील मागें टाकलें आहे, नव्हे खुद्द इंग्लंडमध्येंहि भांडवल ओतण्यास सुरुवात केली आहे. उलट भारतीय भांडवलशाहीनें ठिकठिकाणीं हार खाऊन या अपयशाचें खापर सरकारच्या धोरणावर फोडलें आहे. श्री. नंदा म्हण-

तात कीं, कापडाची निर्यात कमी होण्याचें कारण या धंद्यांतील व्यवस्थापक वर्ग हा अकार्यक्षम आहे. या टीकेचा राग येऊन अनेकांनीं अनेक प्रकारची आंकडेवारी पुढे टाकली. पण सोलापूरच्या नरसिंग गिरजी गिरणीचें उदाहरण काय सांगतें ? सरकारनें ती चालवायला घेतली तेव्हां सुरुवातीला मजुरांना महागाई भत्त्यांत कपात घ्यायला लावली; पण वर्ष–दीड वर्षाच्या काळांत ती सर्व कपात भरून दिली. मॅनेजिंग एजंटांना हें कां करतां येत नाहीं ? आपल्या मुलीबाळींच्या लग्न-समारंभाचा खर्चदेखील कारखान्यावर लावावयाचा असेल तर मग उत्पादनखर्च कमी कसा होईल* ?

भावी औद्योगिकरणांतील मुख्य प्रश्न आहे भांडवलाचा. मोठ्या प्रमाणावर भांडवल उभारण्यांत खाजगी भांडवलशहांनीं विशेष कर्तबगारी दाखवली आहे काय ? करवाढीमुळें भांडवल उभारणीला अडथळा होतो ही सबब फुसकी वाटते. म्हणजे तत्वत: तें खरें आहे. पण आपल्या देशांत तशी स्थिति निर्माण झाली आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण करवाढीमुळें बचतच होत नाहीं म्हणावें तर सरकारी कर्जें मुदतीच्या आंतच पुरीं होतात. आणि करवाढीमुळें कारखानदारीच परवडत नाहीं असें म्हणण असेल तर मग सरकारकडून किंवा परदेशीय संस्थांकडून भांडवल घेण्यासाठी कारखानदारांची इतकी धडपड कां चालतें ?

खरें म्हणजे, देशांतल्या बचतवाल्यांचा या भांडवलदारांवर पुरेसा विश्वासच नाहीं. अशा स्थितींत भावी औद्योगिकरणांतील नेतृत्वाची जबाबदारी खाजगी कारखानदारीवर टाकणें चूक ठरेल.

शिवाय समाजहिताच्या दृष्टीनें आवश्यक असें क्रमवार नियोजन वगैरे फायद्यांसाठींहि या कामांत सरकारलाच पुढाकार घ्यावा लागणें अपरिहार्य आहे. पायाभूत उद्योग सरकारनें चालवावेत हें तर सर्वमान्यच झालें आहे. उपभोग्य वस्तूंच्या बाबतींत सरकारी भागिदारीनें औद्योगिक सहकारी सोसायट्यांच्या द्वारा विकेंद्रित उद्योगधंदे मोठ्या प्रमाणावर स्थापले पाहिजेत. तरच भांडवल–पुरवठा, बेकारी इ. प्रश्न सोडवणें सोपें जाईल. शिवाय लहान लहान उत्पादकांचा विस्तृत प्रदेशांत पसरलेला वर्ग निर्माण झाल्यामुळें खऱ्या स्पर्धेचें फायदेहि कांहीं अंशीं मिळू शकतील. पण अशा प्रकारची उपाययोजना स्वतंत्र पक्ष सुचवीत नाहीं, आणि कोणी सुचविली तर ती त्याला मान्य होणार नाहीं, मग केवळ प्रस्थापित हितसंबंधांचें संरक्षण हेंच खरें त्या पक्षाचें उद्दिष्ट आहे असें म्हटलें तर त्यांत काय चूक ठरेल ?

अर्थात् या सर्व धोरणांमुळें नोकरशाहीचा प्रश्न निर्माण होणार आहे हें कोणी नाकारीत नाहीं, किंवा त्याचें गांभीर्य कमी करण्याचाहि कोणाचा हेतु नाहीं. ही खरे म्हणजे शृंगापत्ति आहे. त्वरित शेतीसुधारणा, वेगवान व समतोल औद्योगिकरण आणि पुरेशा सामाजिक सुखसोयी (शिक्षण, आरोग्य, अन्य संरक्षण इ. ) या पाहिजे असतील तर त्यांत सरकारनेंच पुढाकार घेतला पाहिजे असें म्हणण्यांत जनतेच्या स्वयंस्फूर्त कर्तृत्वाचा अवमान करण्याचा इरादा नाहीं. पण जनतेचा उत्साह देखील योग्य प्रकारें कार्यान्वित करणें हें सरकारलाच जास्त चांगल्या प्रकारें जमूं शकेल. हें सर्व साधण्यासाठीं नोकरशाहीची वाढ होणें अटळ आहे. ‘ नवा वर्ग ’ निर्माण होणारच. पण तो होऊं नये म्हणून सर्वांगीण विकासाचा कार्यक्रमच नको असें म्हणणें आत्मघातकीपणाचें होईल. तें जनमतालाहि मान्य होणार नाहीं. म्हणून ज्यांना व्यक्तिस्वातंत्र्याची खरी कळकळ आहे त्यांनीं हा धोका गृहीत धरूनच उपाययोजना शोधली पाहिजे. राजकीय व आर्थिक सत्तेचें जास्तींत जास्त विकेंद्रिकरण करणें, लोकांना आपल्यासमोरील प्रश्नांबाबत जागरूक बनवणें, त्यांच्या प्रतिनिधींना

---

* सोलापूरच्याच जुन्या गिरणीचा कारभार याची साक्ष देईल.

सरकारी कामकाजाचें राजकीय तसेंच आर्थिक क्षेत्रांतील अंतरंग समजावणें व मोक्याच्या ठिकाणीं असलेल्या अधिकाऱ्यांवर लोकप्रतिनिधींची नियंत्रणवजा देखरेख बसविणें अशा प्रकारचें कार्यक्रम राजकीय पक्षांनीं हातीं घेतलें पाहिजेत. तेंच आजचें त्यांचें खरें कार्य आहे. पण स्वतंत्र पक्ष असें कांहीं करूं इच्छित नाहीं. मग भारतीय राजकारणाला या पक्षाचा उपयोग काय ?

## स्वतंत्र पक्षाच्या दोन घोषणांची छाननी

स्वतंत्र पक्षाच्या आणखी दोन घोषणांची अशीच छाननी केली पाहिजे. २१-कलमी कार्यक्रमांतील ५ वें कलम म्हणतें कीं सध्या जीवनमान वाढविण्याच्या घोषणेमागील भौतिकवादी तत्त्वज्ञानाला विरोध करून त्या जागीं आध्यात्मिक मूल्यांचीं प्रस्थापना करणें हाहि या पक्षाचा एक कार्यक्रम असेल. भारतांत अध्यात्माची हांक दिली कीं जनता जमते हा स्वतंत्र पक्षीयांचा होरा दिसतो. पण तो कदाचित् खरा ठरला तरी जनहिताच्या दृष्टीनें तें योग्य होणार नाहीं. आपल्या सर्वसामान्य जनतेचें जीवनमान वाढवणें ही आजची पवित्र प्रतिज्ञा आहे, कुणी तिचें विडंबन करण्याच्या भरीस पडूं नये. अर्थात् हें मान्य कीं, केवळ जीवनमान वाढल्यानें आपलें सांस्कृतिक जीवन उंचावणार नाहीं. त्यासाठीं नव्या नीतिमूल्यांची प्रतिष्ठापना करावी लागणार आहे. पण हीं नवीं मूल्यें म्हणजे नव्या बाटलींतली जुनी दारू नव्हे. या नव्या मूल्यांचा जीवनमान वाढविण्याशीं विरोध तर असूं नयेच; पण त्यांचा जुन्या अध्यात्माशींहि कांहीं संबंध असणार नाहीं. राजाजी अजूनहि मानतात कीं, आजच्या आपल्या अवस्थेंत गीता व उपनिषदें यांच्याकडूनच आपल्याला खरें मार्गदर्शन मिळेल. राजाजींनीं या अध्यात्मवादी गूढगुंजनांत रममाण होण्यास कांहींच हरकत नाहीं. तेंच जे. कृष्णमूर्ति वा इतर तत्सम तत्त्वज्ञ करीत आहेत. पण हे सगळे श्रीमंतांचे चोचले होत आणि नव्या समाजधारणेसाठी त्यांचा कांहींहि उपयोग नाहीं हें केव्हां तरी एकदां आपण स्वतःलाच स्पष्टपणें बजावलें पाहिजे.

माणसानें चांगलें वागायचें तें आत्म्याच्या कल्याणासाठीं नव्हे तर समाजाच्या स्थैर्यासाठीं. कांहीं किमान नागरिक गुण असल्याशिवाय, सर्वांचा न्याय हक्क मान्य करण्यासाठी स्वतःला झीज सोसण्याची तयारी सर्व नागरिकांत बाणल्याशिवाय नवा समाज स्थिर राहणार नाहीं व पर्यायानें व्यक्तिस्वातंत्र्यहि संभवत नाहीं. तेव्हां हें नवें नीतिशास्त्र केवळ विवेकनिष्ठ मानवतावादावर आधारलल असलें पाहिजे. जुन्या, भोंगळ कल्पनांचा गोंधळ घालून चालणार नाहीं. पण असें नवें नीतिशास्त्र मांडणारा तत्त्वचिंतक या नव्या पक्षांत कोणी दिसत नाहीं.

तीच गोष्ट म. गांधींच्या विश्वस्त कल्पनेची. औद्योगिक क्षेत्रांत या कल्पनेचा अवलंब करण्याचा स्वतंत्र पक्ष प्रयत्न करील असें म्हणणें म्हणजे केवळ लोकप्रिय शब्द वापरणें नव्हे; तें शुद्ध राजकीय ढोंग आहे. याचें कारण असें कीं, विश्वस्तकल्पना अंमलांत आणण्यासाठी कोणती यंत्रणा असेल हें अजून ठरलेलें नाहीं, नव्हे त्याबद्दल कोणी गंभीरपणें विचारहि केला नाहीं. श्री. आर्. पी. मसानी (म्हणजे मिनू मसानींचे वडील ) यांनीं आपल्या 'The Five Gifts' या पुस्तकांत मिनू मसानी व आचार्य विनोबा यांच्यांत गया जिल्ह्यांत झालेल्या चर्चेचा उल्लेख केला आहे. त्यावेळीं मसानींनीं विनोबांना विचारलें, " विश्वस्त कल्पना प्रत्यक्षांत आणण्यासाठी उद्योगपतींनीं काय करावें ? "

विनोबा : " संपत्तिदान करावें. "

मसानी : " पण संपत्तिदानामुळें भूमिहीनांना मदत होईल; प्रत्यक्ष मजुरांसाठी काय होणार ? "

विनोबा : मजुरांसाठी विश्वस्त कल्पनेच्या दृष्टीनें काय करावें हें मला एवढयांत सांगतां येणार नाहीं."

मसानी : "त्यांच्या उद्योगधंद्यांत उद्योगपतींनीं भूदानाचें तत्त्व कसें अमलांत आणावें ?"

यावर विनोबांनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं.

म्हणजे विश्वस्तकल्पना ही अजून तरी केवळ एक स्वप्नदर्शी कल्पना आहे, प्रत्यक्षांत अंमलांत आणण्याचा तो कार्यक्रम नव्हे. आणि हें मसानींना चांगलें माहीत आहे. मग तें कलम स्वतंत्र पक्षाच्या घोषणापत्रांत कां घातलें ? केवळ जयप्रकाश–विनोबांचे आशीर्वाद मिळविण्यासाठींच ना ? यांत राजकीय ढोंग नाहीं म्हणावयाचें तर मग काय म्हणावयाचें ? विश्वस्त कल्पनेचा खरा अर्थ पाहिजेच असेल तर तो म्हणजे संविभाजन ! हें स्वीकारण्याची उद्योगपतींची किंवा निदान स्वतंत्रपक्षाची तरी तयारी आहे काय ? मग घोषणाबाजीबद्दल काँग्रेसला किंवा इतर पक्षांना दूषण देण्यांत काय अर्थ ?

अशा प्रकारचा कार्यक्रम घेऊन जर स्वतंत्र पक्ष जनतेसमोर उभा राहिला तर त्याला विशेष पाठिंबा मिळेल असें वाटत नाहीं. संघटनेचा प्रश्न निराळा; केवळ वैचारिकदृष्टयादेखील हा पक्ष जनमनाची पकड घेण्यास पूर्णतया असमर्थ आहे. म्हणून हा नवा विरोध नव्हे; जुन्यांचाच नव्यानें संघटित झालेला विरोध होय. म्हणून त्याचें भविष्य स्पष्ट आहे. मग त्याला शुभेच्छा चिंतण्याचा शिष्टाचार पाळायला काय हरकत आहे ?





अनुक्रमणिका

श्री. यशवन्त भास्कर दामले

# हरिकथा — लेखांक २ रा

## श्रोत्यांचा प्रतिसाद

श्रोत्यांमध्यें स्त्रियांचा अंतर्भाव करतां आला नाहीं. जवळ जवळ ३७,०५५ श्रोत्यांपैकीं सुमारें १४,६२० स्त्रिया होत्या. पुरुष श्रोत्यांपैकीं सुमारें शेंकडा एक श्रोत्यांचीं मतें अजमावलीं. प्रत्यक्ष श्रोत्यांची व त्यांच्या उत्तरांची वर्गवारी करण्यापूर्वी कथेचा प्रकार, कथकऱ्याची जात, त्याचा सामाजिक दर्जा आणि कीर्ति ह्या घटकांच्या संदर्भांत त्यांचा विचार करायला हवा. त्याशिवाय कोणत्या वस्तींत कथा झाली ह्याचाहि येथेंच विचार करणें योग्य होईल.

### हरदासी कथा

सर्वसाधारणपणें ब्राह्मण, चां. का. प्रभु प्रामुख्यानें व कांहीं मराठे ह्या कथांना उपस्थित होते. फक्त ५ च कार्यक्रमांच्या वेळीं परिस्थिती निराळी होती. वरच्या व खालच्या जातींचे श्रोते एकाच वेळीं उपस्थित होते. कथेकरी अगदींच सामान्य होता; व श्रोत्यांमध्यें स्त्रिया बहुसंख्य होत्या. कथा महिन्याच्या बोलीवर एका कथाकारांच्या शाळेंत चालू होती. इतर वेळीं खालच्या जातींचाच भरणा जास्त होता. हे चारहि कार्यक्रम कमी अधिक ख्यातीच्या कथेकऱ्यांनीं हलक्या जातींच्या वस्तींत असणाऱ्या देवळांतून केलेले होते. हरदासी कथेकरी सर्वजण ब्राह्मण होते हें वर आलेंच आहे.

### वारकरी कथा

ह्यांतील एक ब्राह्मण कथेकरी अतिशय नांवाजलेला होता. त्याचा टिळक पुण्यतिथी निमित्त ब्राह्मण वस्तींतील देवळांतला कार्यक्रम ऐकणाऱ्यांत बहुसंख्य ब्राह्मण होते व सुशिक्षित होते. मुम्बईच्या उपनगरांत खास ब्राह्मणांनीं घडवलेल्या त्याच्या एका कार्यक्रमाला उच्च व हलक्या जातीचे श्रोते एकाच वेळीं उपस्थित होते. इतर वेळीं त्याच्या कार्यक्रमांना प्रामुख्यानें वारकरीच हजर राहात असत. इतर कथाकारांच्या बाबतींत नेहमींच वारकरी श्रोतृवृंद प्रामुख्यानें असे. एखादा अपवाद सोडला तर वारकरी कथा ही वारकऱ्यांनी वारकऱ्यांसाठींच केलेली, कथा होय.

### राष्ट्रीय कथा

ह्यांतल्या ब्राह्मण कथेकऱ्यांच्या कथा ह्या ब्राह्मण-वस्तींतल्या देवळांमधूनच प्रामुख्यानें झाल्या. मुंबईंतला एक कार्यक्रम संमिश्र वस्तींत झाला व त्याला संमिश्र श्रोतृवृंद हजर होता. इतरवेळीं श्रोते प्रामुख्यानें उच्चवर्णीय ब्राह्मण होते व सुशिक्षित होते. ब्राह्मणेतरांच्या कथांपैकीं दोन पंढरपुरांत वारीच्या वेळीं झाल्या. त्याला वारकरी व अशिक्षित श्रोतृवृंद हजर होता. उरलेल्या कथेकऱ्यांपैकी एकाची कथा गणपति-उत्सवाच्या वेळीं पुण्याच्या मंडईंत व इतर दोन कार्यक्रम निवडणुकीपूर्वी संयुक्त महाराष्ट्राच्या प्रचारासाठीं म्हणून खेड्यांत झाले. ह्या सर्व कार्यक्रमांना अशिक्षित मराठे व लिहितां वाचतांहि न येणारे खालच्या जातींचे श्रोतेच हजर होते.

## श्रोत्यांचें व त्यांच्या प्रतिसादाचें वर्णन

ह्या वर्णनांत आंतापर्यंतची विभागणीची पद्धति पाळणें अशक्य आहे. तीन कथांच्या वेळीं प्रश्न पत्रिका भरून घेतल्या नाहींत. त्यांतील एक वारकरी पद्धतीची व दोन राष्ट्रीय पद्धतीच्या होत्या. श्रोत्यांची जातवार विभागणी पुढील प्रमाणें : ब्राह्मण : १४७; चां. का. प्रभु : ७; मारवाडी, जैन, गुजर व तांबट : १२, मराठे : ५३, शिंपी, सुतार, माळी, गवळी, कोष्टी, न्हावी, तेली : २६, वंजारी : ४, हरिजन : १ व ब्राह्मोसमाजिस्ट : १. वयानुसार वर्गवारी अशी : ११ ते १५ तील २; १६ ते २० : १८; २१ ते २५ : ३४; २६ ते ३० : २४; ३१ ते ३५ : १७; ३६ ते ४० : २६; ४१ ते ४५ : २१; ४६ ते ५० : २६; ५१ ते ५५ : २९; ५६ ते ६० : २९; ६१ व वरील ३१. एकंदर ७८ श्रोते वयानें एकतीस वर्षांपेक्षां कमी होते. तरुण लोक कथेला जातात हें त्यावरून स्पष्ट होतें.



अनुक्रमणिका

शिक्षणाच्या दृष्टीनें ह्या श्रोत्यांची वर्गवारी पुढील प्रमाणे :- अक्षर ओळखहि नसलेले : ११, लिहितां वाचतां येणारे : ४३, मराठी १ ते ३ इयत्ता : ३, ४ ते ७ इयत्ता : २१, फायनल ते सेकंड इयर ट्रेंड : १४, ८ वी ते १० वी : २४, मॅट्रिक ते एफ्. वाय्. ६०, इंटर झालेले २१, पदवीधर : २६, उच्चपदवी असणारे : १६, यांत्रिक डिप्लोमा अगर पदवी असणारे : ३. (५ जणांनीं ह्या प्रश्नाला उत्तरच दिलें नाहीं.) पन्नास टक्क्याहून अधिक श्रोत्यांना नव्यापद्धतीचें शिक्षण मिळालेलें आढळून आलें.

हरिकथा ऐकण्याची गोडी कशी निर्माण झाली तें समजावून घेण्यासाठीं कांहीं प्रश्न विचारण्यांत आले होते. १२३ श्रोत्यांनी प्रथम कथा ऐकली ती घरांतल्या कुणातरी माणसाबरोबर, त्यांतला एकच जण प्रथम कथेला बायकोबरोबर गेलों असें सांगणारा निघाला. ५१ श्रोते मित्रांबरोबर आणि ३१ स्वतः होऊन गेलेले होते. २१ जणांनीं ह्या प्रश्नाचें उत्तरच दिलें नव्हतें. बहुसंख्य श्रोते अगदी नियमानें नाहीं तरी बऱ्याच वेळां कथा ऐकतात असें आढळलें. ७३ जणांनीं आपण लहानपणापासून कथा ऐकतों असें सांगितलें. हरिकथेंतील सर्वांत महत्त्वाच्या विषयासंबंधींचीं मतें सविस्तरपणें देणें स्थलाभावीं सर्वस्वीं अशक्य आहे. पण भक्ति, तत्त्वज्ञान, नीतिचर्चा, संतमहिमा, राजकीय चर्चा यांचें महत्त्व मानणारे प्रत्येकीं पंधरा ते वीस श्रोते होते. कशालाच महत्त्व नाहीं असें सांगणारेहि सात श्रोते निघाले. बेचाळीस जणांना श्रोत्यांच्या कलाचाहि कथाविषयावर परिणाम होतो असें वाटलें तर पंचाहत्तर जण फक्त कथेकऱ्याचाच कल महत्त्वाचा असतो असें सांगणारे निघाले. आठ जणांनीं श्रोते कसे असतील त्यावर त्यांचा परिणाम अवलंबून राहील असें सांगितलें.

हरिकथेच्या उद्दिष्टांबद्दलहि मनोरंजक मतें ऐकायला सांपडलीं. अठ्ठावीस जणांच्या मतें समाजसुधारणा, एकोणीस जणांच्या मतें चारित्र्यसंवर्धन व संख्येच्या उतरत्या प्रमाणांत भक्तिगुणवर्धन, तात्त्विक चर्चा, धर्मनिष्ठा, सुधारणा, ज्ञानदान, राष्ट्रप्रेम, हीं हरिकथेचीं उद्दिष्टें सांगण्यांत आलीं. एकशें सत्रा जणांनी ह्या प्रश्नाला उत्तरच दिलें नाहीं. श्रोत्यांत बहुसंख्य ब्राह्मण होते हें खरें असलें तरी हरिकथेपासूनच्या अपेक्षा व श्रोत्याची जात यांत एक स्पष्ट संबंध असल्याचें दिसून आलें. तत्त्वचर्चा अपेक्षिणाऱ्या सतरा जणांपैकीं तेरा ब्राह्मण होते. चारित्र्यवर्धक विषय सुचविणाऱ्यांत ब्राह्मण बहुसंख्य होते. ह्या उलट ब्राह्मणेतर श्रोते साधारणपणें ज्ञान व शिक्षण ह्यांच्या प्रसारावर खूप भर देतात असें आढळलें. समाजसुधारणेवर विशेष भर देणारे सगळे तरुण श्रोते होते. तीच गोष्ट राष्ट्रप्रेम ह्या विषयासंबंधीं. साधारणपणें ह्यापेक्षां वयानें जास्त असणाऱ्यांचा कल तत्त्वचर्चा, भक्तिनिष्ठा, चारित्र्य वगैरेकडे जास्त दिसला. मॅट्रिक व त्याहून अधिक शिक्षण घेतलेले श्रोते चारित्र्य, ज्ञान विस्तार, समाजसुधारणा, राष्ट्रप्रेम, आणि तत्त्वचर्चा ह्या विषयांवर भर देणाऱ्यांत बहुसंख्येनें आढळले. सहा लिहितांवाचतां न येणाऱ्या श्रोत्यांनींहि ह्या प्रश्नाचें उत्तर दिलें. एकानें समाजसुधारणा, दोघांनीं भक्ति व दोघांनीं सर्वसाधारण सुधारणा हे महत्त्वाचे विषय असल्याचें सांगितलें.

श्रोत्यांना प्रश्न विचारतांना हरिकथेच्या अंगांची प्रमुख व दुय्यम अशी विभागणी केली होती. तत्त्वचर्चा, नीति-तत्त्वें, भक्तिगीतें आणि नामस्मरण हीं प्रमुख व संगीत, कथाविषय, मनोरंजन हीं दुय्यम मानलीं होतीं. निरनिराळ्या प्रकारचीं उत्तरें मिळालीं. त्यांत जवळ जवळ शंभर श्रोते प्रमुख व दुय्यम अशा दोन्ही अंगांचा आस्वाद घेतों असें सांगणारे निघाले. कथाकाराला आवश्यक अशा गुणांबद्दल देखील मतें अजमावलीं तेथेंहि असेच दोन भाग केले. चारित्र्य, ज्ञान, पठण, भक्ति, संन्यस्तवृत्ति, सामाजिक विषयांतील आस्था, इत्यादि प्रमुख व संगीतज्ञान, गायनशक्ति, व्यक्तिमत्त्व, विनोदबुद्धि, इत्यादि दुय्यम गुण मानले होते. एकशें एकोणचाळीस जणांनीं ज्ञान, शिक्षण व पठणशक्ति हे महत्त्वाचे गुण मानले. साठ जणांच्या मतें त्याचें चारित्र्य आणि चौदाजणांना त्याचें सामाजिक घडामोडींत भाग घेणें व गोडी दाखविणें हे महत्त्वाचे गुण वाटले. प्रमुख गुण आवश्यक मानणाऱ्यांतील बावन्न जणांनीं दुय्यम गुणांचा उल्लेख देखील केला नाहीं. पासष्ट जणांनीं दुय्यम गुण देखील महत्त्वाचे आहेत असें सांगितलें. दुय्यम गुणांचा उल्लेख करणारांतल्या सदतीस जणांनीं प्रमुख गुणांचा उल्लेखहि केला नाहीं.

हरिकथेचा सर्वांत जास्त आवडणारा प्रकार कोणता अशाहि आशयाचे प्रश्न विचारले. हरदासी कथेला पहिलें स्थान देणारे ७९, वारकरी कथेला देणारे ७० आणि राष्ट्रीय कथेला हें स्थान देणारे ७९ श्रोते होते. हरदासीकथेला पहिलें स्थान देणाऱ्यांत प्रामुख्यानें ब्राह्मण होते. हरदासी कथेला पहिलें स्थान देण्यांत ५९, वारकरी कथेला तें स्थान देणाऱ्यांत ३१ आणि राष्ट्रीय कथेला देणाऱ्यांत ४० ब्राह्मण होते. केवळ तुलनेसाठी घ्यायचें तर हरदासीकथेला पहिलें स्थान देण्यांत ७, वारकरी कथेला देणाऱ्यांत २१ आणि राष्ट्रीय कथेला देणाऱ्यांत २३ मराठे होते. पस्तीस वर्षांखालील तरुणांनीं विशेषतः राष्ट्रीय कथेला पहिलें स्थान दिल्याचें आढळलें. हरदासी आणि वारकरी कथांच्या बाबतींत वयाचा विशेष उल्लेखनीय असा परिणाम जाणवला नाहीं. व्यक्तिशः प्रत्येक कथेकऱ्याबद्दलहि अशीच तीन स्थानें दर्शविणारी प्रश्नावली श्रोत्यांकडून भरून घेण्यांत आली. जागेच्या अभावी तिचें वर्णन या लेखांत देतां येणें अशक्य आहे. पण विशिष्ट कथाकाराला पहिलें किंवा दुसरें अशीं स्थानें कां दिलीं असेंहि प्रश्न विचारण्यांत आले होते. त्यांत कथेकऱ्याला आवश्यक म्हणून श्रोत्यांनी वर उल्लेखिलेल्या गुणविशेषांचें प्रतिबिंब सांपडलें. पण त्यांत कुठेंहि निरनिराळ्या प्रकारचे गुण असल्यानें पहिलें किंवा दुसरें स्थान दिलें असें आढळलें नाहीं. सर्वत्र कथेकऱ्यांच्या गुणांबद्दल लिहितांना संपूर्ण सुसंगति आढळली. कथेकऱ्याच्या दिलेल्या स्थानाचा त्यावर कांहीं परिणाम झाल्याचें दिसलें नाहीं.

## हरिकथेचा श्रोत्यांच्या मनावरील परिणाम

बावन्नजणांनीं ईश्वरभक्ति, भजन, सतराजणांनीं नीतितत्त्वें, सोळाजणांनीं तत्त्वचर्चा, राजकीय चर्चा, पंधराजणांनीं चारित्र्य आणि अशाच प्रमाणांत राजकारण-चर्चा, संतांचें कार्य, समाज सुधारणा इत्यादि विविध अंगांचा परिणाम झाल्याचें सांगितलें. आठ जणांनीं आपण कथा ऐकल्यानें वारकरी झालों असें सांगितलें. थोड्या जणांनीं हरिकथेचा मनोरंजनाचें साधन म्हणून परिणाम झाला असेंहि सांगितलें. हरिकथेचीं आवडणारीं अंगें आणि कथेकऱ्याकडून अपेक्षित गुण ह्यामध्यें श्रोत्यांच्या उत्तरांत कांहीं परस्परसंबंध असावा असें वाटलें. हरिकथेच्या प्रमुख अंगांना (नीतिचर्चा, चारित्र्य-वर्धन इ.) महत्त्व देणाऱ्यांनीं कथेकऱ्याच्या बाबतींत देखील चारित्र्य, ज्ञान, भक्ति ह्या गुणांचा उल्लेख केलेला आढळला. असे जवळजवळ ९० श्रोते होते. त्यांत ५३ ब्राह्मण, १७ मराठे, १ हरिजन, ५ चां. का. प्रभू इत्यादी लोक होते; भक्ति व श्रद्धा वगैरेंना प्रथम देणारे ११६ श्रोते होते; व त्यांनींहि चारित्र्य व ज्ञान ह्यांचेवर कथाकाराच्याबद्दल भर दिलेला आढळला. निम्याहून अधिक ब्राह्मण असले तरी या वर्गात मराठे, शिंपी इत्यादीहि मोठ्या संख्येनें होते. तत्त्वज्ञानाची चर्चा, आधिभौतिक विषय ह्या अंगांवर भर देणारे एक्कावन्न श्रोते होते. त्यांनीं ज्ञान, चारित्र्य, भक्ति, स्वार्थत्याग, सामाजिक विषयांत गोडी ह्या गुणांचा उल्लेख केलेला आढळला. निम्याहून अधिक ब्राह्मण, बरेचसे मराठे व थोडेसे इतर जातीय ह्या गटांत होते. अठ्ठावीस जणांनी राजकीय व सामाजिक घडामोडींना प्रथम स्थान दिलें होतें. व त्यांनीं ज्ञान, भक्ति, चारित्र्य व सामाजिक विषयांत गोडी हे गुण कथाकाराबद्दल उल्लेखिले होते. ह्या गटांत सतरा ब्राह्मण, सहा शिंपी वगैरे, दोन हरिजन, एक मराठा इत्यादी लोक होते. बहुसंख्य लोक त्यांतले वयाने पस्तीसपेक्षां कमी होते. बहुसंख्य लोक मॅट्रिकपर्यंत शिकलेले होते व एकहि अशिक्षित नव्हता. मनाला विरंगुळा म्हणून हरिकथेकडे बघणारे फक्त सोळा श्रोते होते. त्यांनीं कथेकऱ्याचीं घाटणी, व्यक्तिमत्त्व, रुबाबदारपणा, संगीतज्ञान व आवाज, आणि वक्तृत्वशैली यावर भर दिलेला आढळला. ह्यांत पन्नास टक्के ब्राह्मण होते. १६ ते २५ ह्या वयाचे बरेच जण ह्या गटांत होते. ह्यांत विद्यार्थी, कामगार, पेन्शनर वगैरे लोक होते. हरिकथेकडे वरच्या-दर्जाची करमणूक म्हणून बघणारे नऊ लोक होते. दहा जणांनीं हरिकथेचा आपल्यावर कांहीहि परिणाम झाला नाहीं असें सांगितलें. चौघांनीं घाटणी व्यक्तिमत्त्व वगैरेचा उल्लेख केला होता. सहा जणांनीं कांहींच म्हटले नव्हतें. तीन ब्राह्मण, सहा मराठे, व एक ब्राह्मोसमाजिस्ट होते. शिक्षक, सरकारी नोकर, बेकार, विद्यार्थी, शेतकरी वगैरे लोक ह्या गटांत होते.

## कथेकरी व श्रोते ह्यांचे –
### व्यक्तिगत परस्पर संबंध

लहान व्यक्तिसमूहांबद्दलच्या नवीन सिद्धांतांमध्यें व्यक्तिगत संबंधांचे आदान-प्रदानाच्या एकंदर प्रक्रियेमध्यें असणारे महत्त्वाचें स्थान स्पष्ट करण्यांत आलेलें

आहे. आदान-प्रदानाच्या येथें चर्चिल्या गेलेल्या प्रक्रियेंतील एक महत्त्वाचा दुवा म्हणून व त्याच प्रमाणें ह्या प्रक्रियेच्या भविष्यकालीन धारणेच्या दृष्टीनें पुढील चर्चेचें महत्त्व मोठें आहे. अर्थात ह्या प्रश्नाची चर्चा प्रामुख्यानें श्रोत्यांच्या दृष्टिकोनानुसार केली आहे. कथेकऱ्यांना ह्या संदर्भात विशिष्ट प्रश्न विचारलेले नव्हते. श्रोत्यांना मात्र त्यांच्या कुणा कथेकऱ्यांशीं ओळखी होत्या काय, असल्यास त्यांचीं नांवें, संबंधांची दृढता, चर्चेचे विषय यासंबंधीं प्रश्न विचारण्यांत आले होते.

एकशेपंचवीस श्रोत्यांनीं आपला कधीं कथेकऱ्याशीं व्यक्तिगत संबंध आलाच नाहीं असें सांगितले. दहा जणांनीं कथेकऱ्यांशीं थोडीशी ओळख असली तरी प्रत्यक्ष संबंध कधीं ठेवला नाहीं असें सांगितलें. सत्तावीस जणांनीं एकेका कथेकऱ्यांशीं ओळख असल्याचें व त्याला नेहमीं भेटतों असें सांगितलें. कथेकऱ्यांशीं केलेल्या चर्चेचे विषय सामाजिक, धार्मिक, भक्तिमार्ग विषयक, हल्लींच्या परिस्थितीविषयीं, संत चरित्रें, अभ्यासाविषयीं, संगीत, एकमेकाची खुशाली व हरिकथेविषयीं असल्याचें त्यांनीं सांगितलें. बासष्ट जणांनीं एकाहून अधिक कथेकऱ्यांना नेहमीं भेटतों असें सांगितलें. साठ जणांनीं एखाददुसऱ्या कथेकऱ्याला अधूनमधून भेटतों असें सांगितलें. ह्या सगळयांचा मिळून विचार करतां परमार्थविचार करणारे १८, हरिकथेवर चर्चा करणारेहि १८, धार्मिक विषयांवर चर्चा करणारे १६, भक्तिमार्गाची चर्चा करणारे ११, सामाजिक चर्चा करणारे १०, एकमेकाच्या सुखदुःखाच्या गोष्टी करणारे ९, संतचरित्रांवर चर्चा करणारे ८, हल्लींच्या परिस्थितीवर चर्चा करणारे ५, संगीतावर बोलणारे २, व पुराणांवर बोलणारे २, अशी विभागणी होईल.

श्रोत्यांनी उल्लेखिलेल्या अशा त्रेपन्न कथेकऱ्यांपैकीं तेहतीस जणांना कांहीं श्रोते नेहमी भेटत असत. त्यांत तेरा राष्ट्रीय कथेकरी, पांच वारकरी कथेकरी व बाकीचे हरदासी कथेकरी होते. ह्यांतले फक्त तेरा कथेकरी ब्राह्मणेतर होते. ज्या कथेकऱ्यांना श्रोते नेहमी भेटत त्यांत २५ ब्राह्मण व इतर ब्राह्मणेतर होते. त्या ब्राह्मणेतर कथेकऱ्यांना नेहमी भेटणारे श्रोते देखील (१० जण) ब्राह्मणेतरच होते. २ मराठे, १ वाणी, १ वंजारी, १ अहीर गवळी, २ चां. का. प्रभु हे ब्राह्मण कथेकऱ्यांशीं नियमित संबंध असणाऱ्यांमध्यें होते. कथेकऱ्यांची चर्चा करण्याच्या विषयावरून बघता ब्राह्मण व प्रभु यांना महत्त्वाचे वाटणारे विषय एकाच प्रकारचे दिसतात. तेव्हां खरे म्हणजे त्यांचा एकत्र विचार करणें चूक होणार नाहीं. एकंदर एकवीस ब्राह्मण व दोन चां. का. प्रभू हे असे कथेकऱ्यांशीं संबंध ठेवणारांमध्यें होते. निरनिराळया कथेकऱ्यांना दिलेल्या स्थानाचें कारण हें परस्पर ओळखींत व घनिष्ट संबंधांत असलेलें दिसलें. ज्या कथेकऱ्याला सगळयांत जास्त श्रोत्यांनीं पहिले स्थान दिलें होतें त्यालाच सगळयांत जास्त श्रोते बऱ्याच वेळां भेटतात असें आढळून आलें.

कथेकऱ्याशी चर्चिलेल्या विषयांची यादी फार मोठी आहे. कथेकऱ्यांचा श्रोत्यांवर परिणाम होण्याच्या दृष्टीनें भक्ति, नीति, तत्त्वज्ञान इत्यादी विषयांचें फार महत्त्व आहे. हरिकथेसंबंधींची कथेकरी व श्रोते यांत होणारी चर्चा आदानप्रदान प्रक्रियेच्या धारणेच्या दृष्टीनें महत्त्वाची मानली पाहिजे. व्यक्तिगत प्रश्नांच्या चर्चेतून आवश्यक तें जवळिकेचें वातावरण टिकवणें शक्य होतें. त्यामुळें आदान प्रदानाचा प्रवाह अत्यंत सुकर होतो. कथेकऱ्याचें व्यक्तिमत्त्व व त्याची आवड आणि त्याच्याशी चर्चिले जाणारे विषय यांतहि एकप्रकारचा सुसंवाद दिसला. स्पष्टच सांगायचें तर कथेकरी व श्रोता त्यांच्यांतील देवाण-घेवाण ही कथेकऱ्याच्या व्यक्तिमत्त्वावर व आवडी निवडीवर बरीच अवलंबून असली पाहिजे. कथेकऱ्याचा प्रकार व त्याच्याशी चर्चिले जाणारे विषय यांत स्पष्ट संबंध दिसला. राजकीय व सामाजिक विषय प्रामुख्यानें राष्ट्रीय कथेकऱ्यांबरोबर चर्चिले गेलेले दिसले. कांही थोड्या प्रसंगीं श्रोत्यांचा कल महत्त्वाचा ठरला असावा असें दिसतें. एक प्रभु श्रोता कोण कथेकरी आहे ह्याचा विचार न करतां फक्त संस्कृत भाषेचें शिक्षणांतील स्थान काय या एकाच विषयावर चर्चा करीत असे. अशी विशेष एकाद्या विषयासंबंधीं आस्था असणाऱ्या श्रोत्यांची निरनिराळया जातींतील सात आठ तरी उदाहरणें देतां येतील. तेव्हां कथेकरी व श्रोता ह्यांमध्यें चालणारी देवाण घेवाण ही एकांगी नव्हती. केवळ कथेकऱ्यावर

ती अवलंबून नव्हती. त्यामुळें आदान-प्रदानाची प्रक्रिया अधिक बळकट झाली. एकांगी प्रक्रियेंत कथेकरी व श्रोते यांचे परस्परसंबंध केवळ दाता आणि स्वीकारणारा असें राहिले असते.

कथेकऱ्यांना ह्या संबंधांत ' तुमचा संदेश स्वीकारला जातो का ? ' ह्या स्वरूपाचा सामान्य प्रश्न विचारण्यांत आला होता. कांही अपवाद सोडले तर बहुतेक कथेकऱ्यांचा, नवी पिढी आपला संदेश ऐकते व आचरते असा आग्रह दिसला. हरिकथा नव्या पिढीला आकर्षित करूं शकत नाहीं याचा दोष हल्लीच्या नास्तिक्यवाद, राजकारण व सरकार आणि करमणुकीच्या सिनेमासारख्या प्रभावी साधनांना देण्यांत आला. परन्तु आशावादी कथेकरीच बहुसंख्येनें होते. त्यांच्या मतें नव्या पिढीमध्यें हरिकथेबद्दल गोडी निर्माण करणें अशक्य नाहीं. स्वतःच्या योग्य पद्धतीनें हरिकथेचा संदेश देऊ शकण्याच्या सामर्थ्यावर त्यांचा विश्वास होता. श्रोत्यांवर आपल्या संदेशाचा परिणाम होतो, वजन पडतें असें मानणारे पुष्कळच कथेकरी होते.

## हरिकथेचा भविष्यकाल

आदानप्रदानाचें साधन म्हणून भविष्य काळांत हरिकथेच्या टिकण्याची शक्या शक्यताः— ह्या प्रश्नाचा दोन दृष्टींनीं विचार करायला हवा. हल्लीचे श्रोते ह्या दृष्टीनें कितपत मदत करतात ही एक दृष्टि व नव्या पिढीला हरिकथेंत गोडी वाटते कीं नाहीं ह्यासंबंधीं श्रोत्यांचीं मतें अजमावणें ही दुसरी. नव्या पिढीला खरोखरच गोडी वाटत नसेल तर त्याचीं कारणें काय आहेत ह्या विषयींहि श्रोत्यांचीं मतें बघायला हवींत. ह्या दोनहि मार्गांनीं ह्या प्रश्नाचा विचार करण्यांत आला. कुटुंबांतील वातावरणाचा ह्या बाबतींत फार मोठा परिणाम होतो हें वर आलेंच आहे. श्रोते आपल्या लहान मुलांना कथेला घेऊन जातात काय अशा आशयाचा प्रश्न विचारण्यांत आला होता. त्यांतील बहात्तर जणांना मुलें नसल्यानें किंवा अगदीं लहान असल्यानें त्यांनीं उत्तर देण्याचा प्रश्नच नव्हता. सोळा जणांनीं उत्तरच दिलें नाहीं. चौऱ्यांशी जणांनीं आपण मुलामुलींना बरोबर नेत नाहीं असें सांगितलें. त्यासंबंधीं निराळया आवडी निवडी, सोय, गैरसोय; मुलांना कळत नाहीं, त्रास देतील वगैरे स्वरूपाचीं कारणें देण्यांत आलीं. एकानें आपण फक्त राष्ट्रीय कथेला आपलीं मुलें नेतों असें सांगितलें.

हरिकथेमधील गोडी नाहींशी होते काय आणि त्याची कारणें काय असाहि प्रश्न श्रोत्यांना विचारण्यांत आला होता. एक्केचाळीस जणांच्या मतें गोडी कमीं झालेलीच नाहीं. एकशे एकसष्ठ जणांच्या मतें हरिकथेंतील गोडी कमी होऊं लागली आहे. तेरा जणांना कथेकऱ्याच्या सामर्थ्यावर ती अवलंबून असते असें वाटतें. त्यांच्या मतें राष्ट्रीय कथा हें कार्य सहज करूं शकेल. हरिकथेबद्दलची गोडी वाढते आहे असें म्हणणाऱ्यांत ११ ब्राह्मण व प्रभु, ७ पुढारलेल्या जातीचे व मध्यम जातींचे होते. हरिकथेंतील गोडी कमी होत नाहीं असें सांगणाऱ्या एक्केचाळीस जणांपैकीं १५ ब्राह्मण व प्रभु, २४ पुढारलेल्या व मध्यम जातींचे व दोन हरिजन आणि एक वंजारी होते. वीसवर्षाखालील ३, व पस्तीस वर्षाखालचे आठ श्रोते त्यामध्यें होते. हरिकथेंतील गोडी कमी होते आहे असें सांगणारांतील १०९ ब्राह्मण व प्रभू, ५४ पुढारलेल्या व मध्यम जातींतील व तीन मागासलेल्या जातीचे होते. ह्यांत वीस वर्षांखालील लोकहि तुलनात्मकदृष्टया बरेच होते. मॅट्रिक पर्यंत शिकलेले ३८ व पदवीपरीक्षेपर्यंत व अधिक शिकलेले ९३ लोक ह्या गटांत होते.

हरिकथेबद्दल कमी होत असलेले आकर्षण व त्याची मीमांसा :-- पुढील प्रमाणें कारणें श्रोत्यांकडून सांगण्यांत आलीं. त्यांची क्रमसंख्येप्रमाणें मांडणी अशीः - धर्मनिष्ठेचा अभाव, फॅशन्स्, नवनवी करमणुकीची साधनें, नव्या शिक्षण पद्धतीचा प्रभाव, कथाकारांचा उतरता दर्जा, हरिकथेचा तोचतोचपणा, नास्तिकता, मनोरंजनाची कमतरता, मोकळा वेळ मिळत नाहीं, म्हाताऱ्यांसाठीं हरिकथा असते अशी सर्वत्र पसरलेली समजूत, केवळ धर्मविषयांबद्दल तरुणांना गोडी नाहीं, अनेक पालक स्वतः कथा ऐकत नाहीत वगैरे. ब्राह्मण व प्रभु हे ह्याबाबतींत प्रामुख्यानें बोलतात असें दिसलें. अर्थात् पुढारलेल्या व मध्यम जमातींतीलहि पुष्कळ होते. ब्राह्मण व प्रभु ह्यांनीं धर्मनिष्ठा व धार्मिक शिक्षणाचा अभाव यांवर भर दिलेला आढळला. मध्यम व प्रगत जातींनीं नास्तिकता, नवें शिक्षण, फॅशन्स व करमणुकीचीं साधनें इत्यादींवर व हरिजन वगैरेंनीं

फॅशन्स, धर्मनिष्ठेचा अभाव, घरगुती अडचणीं ह्यावर भर दिलेला आढळला.

शहरांतील श्रोते टीका करण्यांत पुढे होते. पस्तीस-वर्षांखालील श्रोत्यांनीं जुनाट धर्मकल्पना व पद्धति ह्या कोणाला मान्य नाहींत ह्या मुद्द्याचा विशेषत्वानें उल्लेख केलेला आढळला. पस्तीस वर्षावरील श्रोते धर्मनिष्ठा व धार्मिक शिक्षणाचा अभाव हें कारण देणारांमध्यें बहुसंख्य होते. ह्याच गटांतील श्रोते, नवे शिक्षण, फॅशन्स, सरकार, करमणुकीचीं साधनें यांना विशेषत्वानें दोष देणारांत होते. पण सर्वच लहान मोठ्यांनीं एकमुखानें अधिक मनोरंजनाची मागणी केली. स्थूलमानानें असेंहि म्हणतां येईल कीं ज्यांना उच्च शिक्षण मिळालें होतें असें श्रोते टीका करण्याच्या बाबतींत व मीमांसा करण्यांत पुढाकार घेतांना दिसले.

जातां जातां एका गोष्टीचा उल्लेख करायला हवा. संयुक्त महाराष्ट्राच्या प्रचारासाठीं निवडणुकींपूर्वी खेड्यांत झालेल्या दोन राष्ट्रीय कथांचा उल्लेख वर आला आहे. ह्या कार्यक्रमांना लेखक स्वतः उपस्थित होता. ह्यावेळीं प्रश्नपत्रिका भरून घेणें शक्य नव्हतें. कथेमध्यें कॉंग्रेसनें केलेल्या कृत्यांचा ताळेबंदच दाखवण्यांत आला. जनतेच्या रक्तावर पोसलीं जाणारीं बांडगुळें वाढलीं आहेत असा आरोप करण्यांत आला. तेंव्हां लोकांनी एकमतानें समितीला निवडून द्यावें असें आग्रहानें सांगण्यांत आलें. त्यामुळें प्रश्नपत्रिका न वाटता केवळ ह्या प्रचाराचा लोकांच्या मनावर काय परिणाम झाला आहे ह्याचा आढावा घ्यावा असा विचार केला. सुरुवातीला कार्यक्रम सुरु करायला देखील मदत मिळत नव्हती. हीं खेडीं कॉंग्रेसची पाठीराखी म्हणून प्रसिद्ध होतीं. प्रत्येक कार्यक्रमांत दहा श्रोत्यांना प्रश्न विचारले. लोकांचे कथा, घाटणी, विषय व कथेकरी यासंबंधींच फक्त मत विचारलें. कथेकऱ्याबद्दल लोक स्तुतिपूर्ण शब्दांत बोलले व बहुसंख्य लोक समितीला मत देतील असें त्यांनी भाकीतहि केलें. अर्थात् ह्या प्रतिसादाला विश्वासार्ह मानणें चूक ठरेल पण ह्या एके काळीं कॉंग्रेसवादी समजल्या जाणाऱ्या मतदार संघातून समितीचे उमेदवार बहुसंख्येनें निवडून आले ह्याचा उल्लेख करायला हवा.

## उपसंहार– हरिकथेचें स्वरूप व तिचे महाराष्ट्रांतील स्थान

हरिकथेची सिद्ध अवस्था ही शहरी आहे व प्राचीन परंपरा खेडुतांपर्यंत पोंचवणारी ती एक संस्था आहे. संस्कृतीचे वहन हें तिचें स्पष्ट कार्य आहे. मनोरंजनाचा त्यांत अभाव नाहीं. अर्थात त्याचें प्रमाण निरनिराळ्या घटकांनुसार बदलतें. श्रोत्यांचे विचार व कृति यांना मार्गदर्शन करण्याचें आपलें कार्य ती चोखपणें बजावील पण कुटुंब व शाळा यांनीं ह्यासंबंधीं आपलें कार्य व्यवस्थितपणें पार पाडलें पाहिजे. हरिकथा न डळमळणारी समाजव्यवस्था व सुनियंत्रित बदल पसंत करते. कांहीं कथेकरी अत्यंत महत्त्वाच्या व मोठमोठ्या सुधारणांचा प्रचार करतात हें खरें आहे. पण त्यांचा परंपरागत व सनदशीर मार्गावर पूर्ण विश्वास आहे. त्यांनीं हिंदुपरंपरेवर व तिच्या मूलतत्त्वांवर कधींहि हल्ला चढवलेला नाहीं. नेहमींच देवाण-घेवाण करण्याची त्यांची वृत्ति होती. ह्यापूर्वी उल्लेखिलेल्या अनेक कारणांमुळें हरिकथेला महाराष्ट्रांत अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे. सामान्य जनतेपासून ते उच्च वर्णीयांपर्यन्त सर्वांना तिची गोडी आहे. सर्वसाधारणपणें स्थितिनिष्ठेकडे तिची प्रवृत्ति असली तरी ज्या मार्गानें मूलभूत समाजधारणा डळमळणार नाहीं असे बदलहि ती सुचवते. जातींमधील उच्चनीचता, वय, शिक्षण, धंदा ह्यांनी कधीं हरिकथेविरुद्ध बंड केलें नाहीं. त्यांचा हरिकथेच्या स्वरूपावर पद्धतींवर व प्रकारावर मात्र परिणाम झाला.

## कथेकऱ्यांचें स्थान व विचार

बहुसंख्य कथेकरी ब्राह्मण असल्यानें ह्या धंद्याला एक मानाचें स्थान आलें आहे. ज्ञानाचाहि हें मानाचें स्थान मिळण्यांत मोठा हात आहे. कांही कला व सेवाभाव हीं आणखीं कारणें आहेत. आर्थिक दृष्ट्या मध्यम वर्गाचे असले तरी ह्या अलौकिक मानामुळें कथेकऱ्यांचें स्थान फार वरच्या दर्जाचें ठरलें. अर्थात् ह्याला कांही आवश्यक अशा उपगुणांचा उल्लेखहि कथेकऱ्यांनीं केला. एकंदर कथेच्या कार्याविषयी कथेकऱ्यांमध्यें एकमत दिसलें. भक्ति, ज्ञान, संन्यस्तवृत्ती, हीं महत्त्वाचीं अंगें मानलेलीं दिसलीं. संस्कृतिवहनाच्या कार्यांत हरिकथेला फार महत्त्वाचें कार्य करावें लागतें असें त्यांचें मत दिसलें. अर्थात बदलत्या कालानुसार व

बदलत्या आकांक्षानुसार थोडेसे बदल हरिकथेंत करणें आवश्यक आहे व तसें झालें तर अजूनहि हरिकथा लोकांच्या मनाची पकड घेऊ शकेल.

### श्रोते व त्यांचीं मतें

उच्च जातींचे संख्याबाहुल्य हा श्रोतृवृंदासंबंधीचा प्रथम लक्षांत रहाणारा विशेष. तितकाच महत्त्वाचा दुसरा विशेष म्हणजे अस्पृश्य श्रोत्यांचा अभाव. बऱ्याचश्या कथा देवळामधून झाल्या असें याचें उत्तर देता येईल. निरनिराळया वयाचे, धंद्याचे लोक कथांना हजर होते ही गोष्ट स्पष्ट आहे. तरुणांना कथेंत गोडी वाटत नाहीं ह्या गृहीत गोष्टीवर विश्वास दिसला. श्रोत्यांमध्यें कांहीं विद्यार्थी देखील होते. अनेक चांगल्यापैकीं उच्च शिक्षण घेतलेलेहि होते. कथा व कथेकरी ह्यासंबंधींची श्रोत्यांचीं मतें व त्यांची जात, वय, धंदा वस्ती व शिवाय कथेकऱ्याची जात, शिक्षण, पंथ व व्यक्तिगत कीर्ती ह्यांचा विशिष्ट परस्पर-संबंध दिसून आला. एक गोष्ट अगदीं निश्चितपणें म्हणता येईल की हरिकथा भविष्य काळांत टिकणें आवश्यक आहे ह्यावर बहुतेकांचा ठाम विश्वास होता.

### हरिकथेचा भविष्यकाल

आपल्या मुलांना कथेला नेणारे कांही श्रोते आहेत. कांहीं अडचणी नसत्या तर मुलांना नेण्याची इच्छा असणारेहि बरेच आहेत. श्रोत्यांनी कांहीं प्रसंगीं कांहीं बदल सुचवले. पण हरिकथा चालू राहावी ह्याविषयीं सर्वांचें एकमत दिसलें. कांही बदल जर घडवून आणले तर हरिकथेचें भविष्य काळांतील आयुष्य निर्वेध आहे असें म्हणतां येईल. हरिकथा ही साधारणतः संघटक व स्थितिनिष्ठ शक्ति राहील. तिनें बदल घडवावा असें सुचवलेच तर त्या बदलाचें स्वरूप नेहमींच क्रमाक्रमानें व हिंदूसमाजव्यवस्थेच्या एकसंध रचनेला धक्का न लावतां व्यक्त होणारे असेल.

---

डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये

# आधुनिक मराठी लेखनपद्धतीचे शिल्पकार : २ :

## ( ३ ) कृष्णशास्त्री चिपळूणकर

ट्रान्सलेशन – एक्झिबिशनर, दक्षिणाप्राइझ कमेटीचे सेक्रेटरी, मराठीचे असिस्टंट प्रोफेसर, ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपॉल अशा विविध अधिकाराच्या व मराठी भाषा आणि तिचें लेखन यांशीं संबंध असणाऱ्या जागांवर काम केलेल्या थोरल्या शास्त्रीबुवांनीं मराठी व्याकरण व मराठी ( शुद्ध ) लेखन या विषयांवर स्वतः लेखन केलें नसतें तरच नवल. कँडी साहेबाला मराठी लेखनासंबंधीं व व्याकरणासंबंधीं एतद्देशीय विद्वानांशीं जे वाद करावे लागले, व अखेर निर्णय द्यावे लागले त्या निर्णयांशीं कृष्णशास्त्री बव्हंशीं सहमत असत. सरकारी दप्तरांत याचे भरपूर पुरावे सांपडूं शकतात. परंतु या विषयींच्या त्यांच्या परिपक्व विचारांचें सार 'शालापत्रकां' तून प्रथम प्रसिद्ध झालेल्या व नंतर "मराठी व्याकरणावरील निबंध" या नांवाच्या पुस्तकांत संग्रहित झालेल्या लेखांत सांपडतें.

बोलण्याची भाषा व लिहिण्याची भाषा यांत फरक पडतो याबद्दल शास्त्रीबोवांना संदेह दिसत नाहीं. ते म्हणतात, "भाषेचे भाग दोन; एक बोलण्याची भाषा व दुसरी लिहिण्याची भाषा. त्यांत पहिल्या प्रकारच्या भाषेपेक्षां दुसऱ्या प्रकारची भाषा विशेष स्थिर असते; म्हणजे तींत तितका लवकर फेरफार होत नाहीं, व या कारणानें ती व्याकरणाच्या आळयांत राहण्यास योग्य ठरते.[1] मात्र तेवढ्यानें एक शुद्ध व दुसरी अशुद्ध होत नाहीं, हेंहि त्यांनीं पुढें स्पष्ट केलें आहे.[2] कारण कोणतीहि भाषा जशी सर्वत्र सारखी नसते, तद्वत् मराठी भाषाहि सर्व मुलुखांत एक सारखी नाहीं. फारतर काय, एका शहरांतील किंवा गांवांतील लोकांची भाषासुद्धां सर्वप्रकारें सारखी नसते. अशिक्षित कुणबी, सोनार, शिंपी, सुतार वगैरेंच्या भाषणांत व ब्राह्मण वगैरे वरील जातींच्या लोकांच्या बोलण्यांत तफावत असते. परंतु असें असलें तरी ज्या भाषेचें व्याकरण लिहिलें जातें, ती भाषा प्रतिष्ठितांची असते, विद्यावंतांची असते, आणि म्हणूनच पर्यायानें ग्रंथलेखनाचीहि असते. या भाषेला श्रेष्ठरूप येतें तें केवळ तिचा उपयोग करणाऱ्यांच्या श्रेष्ठत्वानें. शास्त्रीबोवा म्हणतात, त्यांत मोठेमोठे उपयुक्त ग्रंथ होतात. न्यायमनसुबीचीं वगैरे सरकारी व दरबारी कामें चालतात. मोठमोठ्या सभांत वक्त्यांचीं भाषणें, पंडितांचे वादविवाद, उपदेशकांचे उपदेश त्यांत होतात. या व या सारख्या दुसऱ्या कितीएक कारणांनीं तो प्रकार श्रेष्ठ होऊन पुढें सरसावतो, व बाकीचे अडाणीपणाचे ठरून मागें पडतात, व कधीं कधीं नाहींसेहि होतात."[3] दादोबादि वैयाकरणांनीं पुणें प्रांतींच्या ब्राह्मणवर्गाची भाषा व्याकरणासाठीं निवडतांना व जर्विस, कँडी वगैरेंकडून पाठ्यपुस्तकांसाठीं प्रमाण भाषा म्हणून तीच निवडतांना जें कारण लक्षांत घेतलें होतें, त्या कारणाशीं शास्त्रीबोवा सहमत दिसतात. भाषेंतील वैकल्पित रूपांच्या मान्यामान्यतेबाबतहि शास्त्रीबोवांचा कल प्रतिष्ठितांच्या भाषेकडेच झुकतो. 'करवितो,' 'करिवतो' इत्यादि रूपें वैकल्पिक असलीं तरी तीं प्रतिष्ठितांच्या भाषणालेखनांत आढळतात म्हणून तीं सर्व "शुद्ध व ग्राह्य मानलीं पाहिजेत," असें ते सांगतात.[4] परंतु 'मपून', 'तुपून', 'मस', 'तूस', 'करित्यो', 'करित्यात' इत्यादि रूपें "ज्या लोकांच्या लिहिण्यांत व भाषणांत येणाऱ्या भाषेचें निरूपण मराठी व्याकरणांत करण्याचा प्रचार आहे. त्या लोकांच्या भाषेत ... येत नसल्यामुळें ... व्याकरणाच्या दृष्टीनें तीं शब्दरूपें अग्राह्य."[5] शब्दरूपांचे ग्राह्याग्राह्यत्व

१ मराठी व्याकरणावरील निबंध, आ. ३ री, १९२३: पान ११.
२ कित्ता : पा. २४.
३ कित्ता : पा. २६.
४ ,, : पा. १५६.
५ कित्ता : पा. १५७.

ठरवतांना शास्त्रीबोवा व्याकरणदृष्टि लावीत असले तरी ज्या भाषेचें व्याकरण त्यांना अभिप्रेत आहे ती भाषा प्रतिष्ठितांच्या लिहिण्यांतील व बोलण्यांतील भाषा आहे. आणि म्हणूनच त्यांतून लेखनभाषेबद्दल, म्हणजेच पर्यायानें प्रमाणभाषेबद्दल त्यांचें मत स्पष्ट होतें. " त्यानें आपल्या मुलास शाळेंत पाठविला. " " त्यानें तें काम केलेन. " " तूं घर बांधलेस. " इत्यादि वाक्य-प्रयोगाबाबतचीं त्यांचीं मतेंहि लक्षणीय आहेत. कँडीनें या प्रयोगाबाबत कडक धोरण स्वीकारून त्यांना निषिद्ध ठरविलें होतें. कृष्णशास्त्री चिपळूणकरहि त्यांच्याच मताचे दिसतात. " प्रयोगशरणाः वैयाकरणाः " हें त्यांना मान्य असलें तरी, शरण्य प्रयोग कुणाचे याचें तारतम्य निदान लेखनग्राह्यतेबाबत ते विसरत नाहींत. ते म्हणतात, " हे प्रयोग मराठी भाषेची मूलभूत जी संस्कृत भाषा तींत वाक्यरचनेच्या पद्धतीस अनुसरून नसल्यामुळें व प्रसिद्ध व सर्वमान्य मोरोपंत व वामन पंडित इत्यादि कवींच्या ग्रंथांत हे प्रयोग न आढळल्यामुळें, व भाषणांत ते असले तरी एखाद-दुसऱ्या प्रांतांतल्या लोकांच्या भाषणांतच ते येतात यास्तव एकदेशीय असल्यामुळें मराठी व्याकरणकर्त्यांनीं त्यांचा संग्रह केला नाहीं असें दिसतें "[६] व्याकरणकारांचें हें करणें ज्याअर्थी शास्त्रीबोवांना मान्य दिसतें इतकेंच नव्हे तर त्या करण्यामागें व्याकरणकारांना अभिप्रेत असणारीं कारणेंहि शास्त्रीबोवांनीं कोणताहि आक्षेप न घेतां नमूद केली आहेत, त्याअर्थी शास्त्रीबोवांनाहि वरील प्रकारचे प्रयोग लेखनभाषेंत निषिद्ध वाटतात, हें स्पष्ट होतें. मराठी लेखनपद्धतीवर शास्त्रीबोवांनी स्वतंत्रपणें लेखन केलेलें नसलें तरी मराठी व्याकरणावरील त्यांच्या निबंधांत ठिकठिकाणीं त्यांचें एतत्संबंधीचें मत व्यक्त झालेलें आहे. इतकेंच नव्हे तर कँडीसाहेबाला मराठी लेखनपद्धतीसंबंधानें 'ज्ञान-प्रसारक'काराशीं जो वादविवाद करावा लागला त्या वादांत ज्या त्रयस्थांचीं मतें विचारांत घेतलीं गेलीं त्यांत शास्त्रीबोवांच्या मतांना त्यामागील शास्त्रशुद्ध भूमिकेमुळें फार मान होता. आणि म्हणूनच मराठी लेखनपद्धतीच्या शिल्पकारांत शास्त्रीबोवांचें नांव अगत्यानें घ्यावें लागतें.

### (४) विष्णुशास्त्री चिपळूणकर

मराठी भाषेचा उदंड अभिमान बाळगणारे, आणि 'मराठी भाषेचा शिवाजी' ही पदवी सार्थ करणारे निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें लक्ष भाषापद्धति, भाषादूषण, आणि पर्यायानें लेखनशुद्धि या विषयांकडे न वळतें तरच नवल. 'मराठी भाषेची सांप्रतची स्थिति', 'भाषादूषण', 'लेखनशुद्धि' आणि 'भाषापद्धति' हे त्यांचे मराठी भाषेसंबंधींचे प्रमुख लेख. मराठी भाषा इंग्रेजीच्या कचाटयांत सांपडली आहे, इंग्रेजीच्या पगड्यामुळें तिचें स्वत्व व निराळेंपणा नष्ट होण्याच्या बेतांत आहे, आणि म्हणून भाषादूषणाचे गैरप्रकार वर्ज्य करून लेखकांनीं मराठीच्या अभिवृध्यर्थ झटलें पाहिजे हा त्यांचा इशारा. या अनुषंगानेंच लेखनशुद्धीसंबंधींहि त्यांना आपले विचार मांडावे लागले आहेत. एखाद्या ग्रंथकारानें ग्रंथप्रकाशनाच्या मदतीसाठीं विद्याखात्याकडे अर्ज केला तर ग्रंथाची योग्य पारख होण्याऐवजीं त्यांतील व्याकरण-शुद्धीकडेच म्हणजे "ऱ्हस्व, दीर्घ, काना, मात्रा, अनुस्वार, शुद्धप्रयोग" यांकडेच अधिक लक्ष दिलें जाऊन ग्रंथ चांगला किंवा वाईट ठरविला जातो, अशी तक्रार त्यांनीं केली असली[७] तरी लेखनशुद्धीची त्यांना अजीबात कदर नव्हती, असें नव्हें. 'निबंधमाले'च्या १० व्या अंकांत 'लेखनशुद्धि' या नांवाचा स्वतंत्र लेख त्यांनीं लिहिला आहे. आणि या लेखांतच मुख्यतः एतत्संबंधींचें त्यांचें विचार व्यक्त झाले आहेत.

जेव्हां शास्त्र आणि रूढी यांना विरोध उत्पन्न होतो, तेव्हां, एका विशिष्ट मर्यादेपर्यंत व्याकरणशास्त्राप्रमाणें निर्णय करावा हें विष्णुशास्त्र्यांना मान्य आहे. कारण त्यामुळेंच " भाषा निर्दोष होऊन तींत चोहोकडे मेळ बसेल; आणि...... तिचें बाह्य स्वरूप नीटनीटकें होईल.[८]" परंतु येथें व्याकरणाची मर्यादा नियमित झाली पाहिजे, असें त्यांचें म्हणणें. कारण ती तशी झाली नाहीं तर भाषेचा आवश्यक तो 'स्वेच्छा-

६ किता : पा. २४२-२४३.

७ निबंधमाला आवृत्ति १९२६ : पान ११.

८ निबंधमाला आ. ३ री. १९२६. 'लेखनशुद्धि : पा. १०९.

प्रचार ' बंद होऊन ती कृत्रिम बनेल आणि अखेरीस तिच्या अंगचें " अर्थव्यंजकता, माधुर्य, चलाखपणा वगैरे गुण[९]" नष्ट होतील. विष्णुशास्त्र्यांना भाषेच्या अंतर्बाह्य स्वरूपाची व शक्तीची चांगलीच जाण होती, असें दिसतें. व्याकरण आणि रूढी यांच्या विरोधांत व्याकरणाच्या तर्फे फैसला न करतां ते रूढीच्या तर्फे करतात, तेव्हां त्यांच्या मनांत भाषेच्या या अंतःशक्तीचाच विचार अधिक प्रभावी असावा.

लेखनशुद्धीच्या विचारांत रूढीला वा प्रचाराला जरी विष्णुशास्त्री महत्त्व देत असले तरी एतत्संबंधांत व्युत्पत्तीचें महत्त्वहि त्यांना वाटत असावें, असें दिसतें. कारण " आपल्या भाषेच्या मूळ भाषा म्हटल्या म्हणजे बालभाषा, संस्कृत, फारशी व अरबी ह्या होत; यास्तव तिची लेखनपद्धति बसविण्यास या चारी भाषांचें ज्ञान अगोदर अवश्य पाहिजे. "[१०] असें सांगून ज्यास वरील भाषांचें ज्ञान असेल त्यांनीं तें प्रस्तुत विषयास लावून भाषेची व्युत्पत्ति व लेखनपद्धति ही जर सुधारली तर त्यांच्या ज्ञानाचें चीज होणार आहे " असेंहि आवाहन ते करतात. रूढीची बाजू घेत असतांनाच आपलें मत एकांतिकहि ते होऊं देत नाहींत. मात्र कित्येक शब्दांच्या लेखनांत जी धरसोडीची वृत्ति त्यांना आढळे, ती त्यांना मान्य नव्हती. उदा० ' पाहणें, व पाणीं हे शब्द ' पहाणे ' व ' पाणी ' ( निरनुस्वार ) असेहि लिहिले जात. परंतु व्युत्पत्तिदृष्ट्या ' पाहणें' ( ∠पाह ∠पश्य ) व ' पाणीं ' ( ∠पानीयम् ) हेच शब्द शुद्ध असल्यामुळें ते तसेंच लिहिले गेले पाहिजेत असें ते बजावतात. " मूळ व्युत्पत्तीचा विचार केला तर पुष्कळ शब्दांची शुद्ध व ग्राह्य रूपें कोणतीं तीं चांगली समजतील "[११] हें त्यांचें या विचारामागील सूत्र " शास्त्रात् रूढिर्बलीयसी " हें तत्त्व स्वीकारणाऱ्या विष्णुशास्त्र्यांनीं लेखनाच्या संबंधांत व्युत्पत्तीला दिलेला मानहि कांहीं थोडा नव्हे.

परंतु एकंदरींत विष्णुशास्त्र्यांचा कल रूढीकडे अधिक आहे. जशीं रूपें एकदां भाषेंत रूढ होऊन गेलीं आहेत, तशींच तीं कायम राखावीं, असें स्पष्टच सांगतात. उदा० " त्याला रूपवान बायको मिळाली" हें वाक्य "त्याला चांगली बायको मिळाली" या वाक्याप्रमाणेंच अशुद्ध आहे; आणि संस्कृतज्ञांना तें नक्कीच खटकेल. परंतु ते केवळ प्रचारांत असल्यामुळें त्यास अगदीं काढून टाकणें त्यांना प्रशस्त वाटत नाहीं.[१२] " त्यानें त्या पोरीस मारिली ", " मी आंघोळ केली ", " त्यानें तुला लहानाचा मोठा केला, " " तुम्ही जेवलांत ? " वगैरे ज्या " विलक्षण प्रयोगाविषयीं मोठाच वाद " झाला, व ज्यांना कँडी व कँडीपक्षीयांनीं अशुद्ध ठरविलें, ते प्रयोगहि " व्याकरणदृष्ट्या " अशुद्ध आहेत हें ते मान्य करतात. पण हें मान्य करून त्यांना अशुद्ध म्हणतांनाच " रूढिदृष्ट्या ते अत्यंत शुद्ध आहेत[१३] " अशीहि पुस्ती ते लगेच जोडतात. म्हणजे ज्याची व्याकरणावर मोठी भक्ति आहे त्यानें वरील प्रयोग हवेतर व्याकरणशुद्ध लिहावे, पण " रूढीस अनुसरून हजारो सुशिक्षित लोकांच्या बोलण्याप्रमाणें व अभियुक्त कवींच्या लेखाप्रमाणें " जरी कुणीं लिहिलें तरी त्यांस अशुद्ध म्हणण्याचा कोणासहि अधिकार नाही असेंहि ते बजावतात.

विष्णुशास्त्र्यांचें मराठी भाषेवरील प्रेम, त्यांनीं केलेलें समर्थ लेखन, त्या लेखनांतून व्यक्त झालेलीं त्यांचीं मतें, व त्यांचा तत्कालीन लोकांवर झालेला परिणाम इत्यादि लक्षांत घेतां मराठी लेखनपद्धतीच्या विकासांत त्यांच्या मतांचें महत्त्व कमी नाहीं, हें लक्षांत येतें.

---

९ कित्ता : पा. १०९.
१० कित्ता : पा. ११२.
११ कित्ता : पा. ११३.
१२ कित्ता : पा. ११४.
१३ कित्ता : पा. ११५.

प्रा. कृ. मो. शेंबवणेकर

# रामशेजवरील आक्षेपांचें निरसन

आम्ही ' नवभारताच्या ' जुलैच्या अंकांत कालिदासास अभिप्रेत असलेला रामगिरि प्रायः नासिकजवळची रामशेज नामक उंच डोंगरांची रांग, किंवा गोदावरीच्या परिसरांतील अन्य पर्वत असला पाहिजे असें मेघदूताच्या टीकाकारांच्या, वराहमिहिराच्या आणि कालिदास, भवभूति व बाण ह्यांच्या ग्रंथाधारें दाखविलें होतें. श्री. वा. कृ. परांजप्यांचा रामगड व महामहोपाध्याय डॉ. मिराशींचा रामटेक त्या पुराव्याशीं जमत नाहींत. इतकेंच नव्हे, तर त्याच्याशीं स्पष्ट विसंगति दाखवितात, एवढेंच आम्हांस त्या लेखांत प्रथम सिद्ध करावयाचें होतें. त्या कार्यांत प्रतिपक्षभूत झालेले उपरिनिर्दिष्ट दोन्ही लेखकच काय, पण बहुश्रुत वाचकहि कालिदासवर्णित मेघमार्गाची संगति त्या निर्णयाच्या अनुरोधानें कशी लागते, तें आमच्यापासून हक्कानें मागणार ही आम्हांसहि कल्पना होती. परंतु एकाच लेखांत, आणि तो लेखहि एका विशिष्ट कालमर्यादेच्या आंत प्रसिद्ध करण्याचा आमचा संकल्प असल्यामुळें, ती संगति दाखविण्याचें जमलें नाहीं हें येथें स्पष्टपणें सांगतों. कारण ज्याच्या अनुरोधानें ती संगति लावावयाची त्यावरच सर्व लक्ष केंद्रित करणें भाग पडलें. शिवाय, मासिकांत प्रकाशित होणाऱ्या लेखांना कांहींतरी शब्दमर्यादा घालणें भागच असते. आणि ह्या सर्व कारणांमुळें जें त्या वेळीं करतां आलें नाहीं तें पुढें सवडीनें करण्याचें आम्ही ठरविलें होतें. परंतु आमच्या प्रतिभटीभूत महाशयद्वयांनीं तें आम्ही करण्याचें जाणूनबुजून टाळलें, किंवा त्या कर्तव्याची आम्हास जाणीवसुद्धां झाली नाहीं अशी आपली कल्पना करून घेऊन दूषणांची जी अंजली नवभारताच्या ऑगस्टच्या अंकांत आमच्यावर उधळली ती केवळ त्यांची चूक नव्हे हें आम्ही प्रारंभी कबूल करतों. फक्त सत्यान्वेषणावरच सर्व भर देणाऱ्या संशोधकांनीं ईर्षा, औद्धत्य, दर्पोक्ति, वृथाभिमान वगैरे वृत्तींना दूर झाडून जर स्वतःच्या अंतःकरणाचे दरवाजे खुले केले तरच सत्याचा प्रकाश आंतपर्यंत पोंचतो, नाहींतर नाहीं, एवढेंच आम्हास त्यांना सुचवावेंसें वाटतें.

श्री. परांजप्यांनीं ज्या पांच कसोट्या आपल्या लेखांत तत्त्वनिर्णयार्थ दिल्या आहेत त्यांशिवाय त्यांच्या छोट्या लेखांत आम्हांस दुसरें कांहींहि ग्राह्य नाहीं. रामगिरीचा ठावठिकाणा ( Location ) निश्चित करण्यासाठीं तर आम्हीं आमच्या पहिल्या लेखांत वराहमिहिराचा दुसऱ्या चित्रकूटाचें अस्तित्व सूचित करणारा आधार, आणि कालिदास भवभूति व बाण वगैरे महाकवींची रामनिवास व रामसंचार कोठें झाला त्या स्थळांविषयींची निःसंदिग्ध एकवाक्यता, सविस्तर दाखविली आहे. ती एकवाक्यता कोणीहि अमान्य करणें शक्य नसल्यामुळें महामहोपाध्याय डॉ. मिराशींनीं पुढून हल्ला न करतां बगलेवर हल्ले चढविले आहेत. प्रथम त्यांनीं एक अगदीं प्रामादिक विधान आमच्याविरुद्ध केलें आहे, तें त्यांच्या, व विशेषतः वाचकांच्या, नजरेस आणणें आमचें कर्तव्य आहे. रामगिरि हें नांव दक्षिणेंतील चित्रकूटास ' यक्षानें किंवा कुबेरानें दिलें असावें ' हें ' बिनबुडाचें ' अनुमान त्यांनीं आमचेवर लादलें आहे ! परंतु आमच्या पूर्वीच्या लेखांत चित्रकूट अथवा रामगिरि ह्या **ठिकाणाची** निवड त्या यक्षानें किंवा शापदात्या कुबेरानें केली असावी असें आमचें अनुमान दिलें आहे. अर्थात हा प्रमाद दुसऱ्याचें म्हणणें नीट न पाहिल्यामुळें उद्भवला हें निराळें सांगण्याची जरूर नाहीं.

## दंडकारण्य कोणतें ?

म. म. डॉ. मिराशींची ह्या वादांत जर कोणती मोठी चूक झाली असेल तर ती दंडकारण्याच्या मर्यादेची. नासिक-पंचवटी विभाग दंडकारण्यांत नसून रामटेक व त्याच्या आसमंतातचा प्रदेश एवढेंच दंडकारण्य अशी त्यांची प्रामाणिक समजूत दिसते. ही त्यांची समजूत जर खरी धरली तर वाल्मीकीसकट कालिदासादिक महाकवि चुकीचें ठरतात. रामायणांतील

अरण्यकांडांत जेथें शूर्पणखा क्रोधमूर्छित होऊन खरदूषणादिक चौदा हजार राक्षसांचा एकट्या रामानें केलेला संहार रावणाला निवेदन करते तेथें, म्हणजे पंचवटी–जनस्थानालाच दंडकारण्य अशी संज्ञा स्पष्टपणें दिलेली आढळते. तेथें रावणाचा प्रश्न आणि तिचें उत्तर –

हा, ' किमर्थं दण्डकारण्यं प्रविष्टश्च सुदुस्तरम् ।
' रक्षसां भीमवीर्याणां सहस्राणि चतुर्दश ॥
निहतानि शरैस्तीक्ष्णैस्तेनैकेन पदातिना ।
ऋषीणामभयं दत्तं कृतक्षेमाश्च दण्डकाः ॥ '

ह्या वर्णनावरून जेथें खरदूषणादिकांचा वध झाला व त्यामुळें ज्या प्रदेशाला क्षेम म्हणजे अभय प्राप्त झालें तो प्रदेश दण्डकारण्य ह्याविषयीं कोणतीहि शंका राहात नाहीं. त्यानंतर सीतेचा अपहार करण्याकरितां त्याच ठिकाणीं मारीच राक्षसानें सुवर्णमृगाचें रूप धारण करून रामास स्वस्थानापासून दूर नेलें व रावणास इष्ट ती संधी दिली असा पुढील कथाभाग आहे. त्यालाच अनुसरून कालिदासानेंहि ' पञ्चवट्यां ततो रामः...' इत्यादि श्लोकांत ( र. वं. १२–३१ ) तेथेंच रामाचा कायम निवास झाला व तेथेंच सीतेचें रावणानें हरण केलें असें दिलें आहे. आमच्या पहिल्या लेखांत भवभूति व बाण अनुक्रमें उत्तररामचरितांत व कादंबरींत दंडकारण्य हें गोदावरीच्या उगमाजवळच्या प्रदेशाला व्यापून राहिलें होतें असा स्पष्ट पुरावा देतात, म्हणून सविस्तर दाखविलें आहे. विशेषत: रामनिवास व रामसंचार ह्या दोन क्रियांनीं ज्याला पावनत्व आलें असा प्रदेश म्हणजे गोदावरी परिसरच, ह्याविषयीं त्यावरून मुळींच शंका राहात नाहीं. तो पुरावा एकदां दिला गेल्यामुळें त्याची पुनरुक्ति करणें योग्य होणार नाहीं. रघुवंशाच्या चौदाव्या सर्गांतहि ' प्राप्तानि दुःखान्यपि दण्डकायां संचिन्त्यमानानि सुखान्यभूवन् । ' ह्या श्लोकार्धांत निर्दिष्ट केलेला दंडकारण्याचा विभाग पंचवटीच्या दक्षिणेस असलेला प्रदेश होय असें स्पष्ट दिसतें. असें असतां रामटेक दंडकारण्यात येतें ' पण रामशेज मात्र दंडकारण्यांत येत नाहीं ' हें म. म. डॉ. मिराशींचें विधान निरर्थक ठरतें.

## स्वाभाविक नव्हे, कविप्रणित मेघमार्ग

मेघदूतांतील रामगिरि आपल्या मध्यभागीं रामाच्या चरणन्यासानें पवित्र झालेला, आणि सीतेच्या स्नानामुळें ज्यावरील जलाशय पुण्यदायक झाले आहेत असा वर्णिला आहे. आणि त्यामुळें असा पर्वत कोणता असूं शकेल हा वादाचा खरा विषय आहे. ज्याअर्थीं मध्यभारतांतील रामगड किंवा नागपूर जवळचें रामटेक गोदावरीच्या परिसरांत कविकल्पनेनेंसुद्धां बसत नाहींत त्याअर्थीं तीं स्थळें कालिदासाला अभिप्रेत नसावीं असें आम्ही निश्चित धरतों. आणि तें वर्णन एकट्या कालिदासाच्याच काय, पण भवभूतीच्या व बाणाच्या दृष्टीनेंहि फक्त नासिक–पंचवटी विभागांतील उंच पर्वतालाच लागू पडतें हें उघड आहे. ह्या आमच्या मुख्य मुद्याला म. म. डॉ. मिराशी व श्री. परांजपे ह्या दोघांचाहि विरोध असावा असें निदान त्यांच्या लेखांवरून तरी दिसत नाहीं. दोघांचाहि भर जर कशावर असेल तर त्यांनीं प्रमाण म्हणून धरलेलीं जीं स्थळें तीं मेघदूतांतील मेघमार्गाशीं जमतात एवढ्या एका गोष्टीवर वाल्मीकीसकट सर्व कवि राम उत्तरेंतील चित्रकूट सोडून दक्षिणेंत दंडकारण्यांतील पंचवटी, जनस्थान वगैरे ठिकाणीं, म्हणजे गोदावरीच्या प्रदेशांतच नांदत होता असा निर्वाळा देतात. इतर स्थळांवरून जरी त्याचें परिभ्रमण झालें असलें तरी त्यांचा यत्किंचितहि नामनिर्देश नाहीं. अर्थात तीं स्थळें मेघदूतांतील मार्गाशीं जमतात एवढ्यामुळें त्यांचा प्रस्तुत वादांत संबंध येतो. परंतु गोदावरीपरिसरांतील स्थळांची गोष्ट तशी नाहीं. हा फार महत्त्वाचा फरक आहे. आतां रामशेजचा मेघमार्गाशीं मेळ जमतो कीं नाहीं तें पहाणें आवश्यक आहे.

प्रथमतः हें लक्षांत घेणें जरूर आहे कीं कालिदासानें दिलेला मेघमार्ग म्हणजे त्याच्या काळीं जो मार्ग दक्षिणेंतून उत्तरेकडे, म्हणजे नर्मदेच्या पलीकडे, जाण्याकरितां सुविख्यात होता–ज्यावरून उत्तरेंतील राजांचीं सैन्यें दक्षिणेंत किंवा दक्षिणेंतील राजांचीं उत्तरेंत घुसत, ज्यावरून दरसाल हजारों यात्रेकरू काशीस किंवा रामेश्वरास जात, ज्यावरून मालानें भरलेले सहस्रावधि बैल व उंट आंध्र, केरळ, महाराष्ट्र व कर्नाटक वगैरे प्रांतांशीं व्यापार करीत,–त्या मार्गालाच अनुलक्षून कवीनें काव्यरचना केली आहे. तो मार्ग जमिनीवरील असल्यानें, अर्थातच, तो उत्तरेकडे जाणारा असला तरी भूमितींतील रेषेप्रमाणें अगदीं सरळ असणें कधींच शक्य

नाहीं. सर्वहि देशांत जे हमरस्ते पूर्वापार चालत आले आहेत त्यांना प्रायः औदीच्य, पाश्चात्य वगैरे दिशांवरूनच नांवें पडलेलीं दिसतात. परंतु नैसर्गिक अडचणींमुळें त्यांना इतकीं वळणें असतात व त्यांच्या दिशा इतके वेळां बदलतात कीं त्यांची खरी दिशा भौगोलिक ज्ञानानेंच निश्चित केली जाते. मेघदूतांतील मेघाचा मार्ग म्हणजे स्वाभाविक मेघमार्ग नसून कविप्रणीत आहे ह्याविषयीं कोणाचाहि मतभेद असणार नाहीं असें आम्हास वाटतें. किंवा हाच अर्थ अन्य शब्दांत सांगावयाचा झाल्यास, संदेशहारी मेघ आकाशगामी असला तरी त्याची नजर पृथ्वीतलावर आहे. त्याचें सुकाणूं कवीच्या हातांत असल्यामुळें तो स्वतंत्र नसून परतंत्र आहे. रामगिरीचें स्थान कोठेंहि असलें तरी ज्या अलका नगरीस त्याला जावयाचें ती त्याच्या उत्तरेसच असल्यानें कवि त्याला उत्तरेकडे तोंड करून प्रवास करण्यास विनवितो. येथपर्यंत सर्व ठीक आहे. परंतु येथें उत्तरेकडे म्हणजे होकायंत्रानें जी दिशा बरोबर दाखविली जाते त्या दिशेकडे, असा अर्थ करणें बरोबर होणार नाहीं. मुंबई पुण्याकडच्या लोकांना काय, किंवा नागपुरकडच्या लोकांना काय, काशी, प्रयाग वगैरे क्षेत्रें उत्तरेसच वाटतात.

## मेघमार्ग निश्चित कसा करायचा ?

**'प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति,'** म्हणजे नांवें अस्तित्वांत येतात तीं त्या वस्तूमध्यें ज्या गोष्टीचें किंवा पदार्थाचें वर्चस्व असतें त्या गोष्टीवरून किंवा पदार्थावरून येतात, हा न्याय विश्वविख्यात आहे. भूमीवरील मार्ग हवाई मार्गाप्रमाणें किंवा समुद्रमार्गाप्रमाणें केव्हांहि सरळ रेषेंत नसतात म्हणून वर सांगितलेंच आहे. आपल्या भारतवर्षांत दक्षिणापथांतून उत्तरेकडे जातांना सातपुडा व विंध्य पर्वत, नर्मदा नदी, आणि त्या पर्वतांच्या व नदीच्या आधारानें जवळजवळ पूर्वपश्चिम समुद्रांपर्यंत पोंचलेली विंध्याटवी – जिचें वर्णन बाण कवि 'पूर्वापरजलनिधिलग्ना' असें देतो — हे सर्व मोठेच अडथळे होते. आणि त्यामुळें फक्त कांहीं थोडे मार्गच रहदारीस योग्य होते. अर्थात, नासिक-पंचवटी विभागांतला रामगिरि कवीला अभिप्रेत होता असें मानलें तर त्यावरून निघणारा मेघ आज मुंबई–आग्रा सडकेनें निघणाऱ्या प्रवाशाप्रमाणें कांहीं पूर्वेकडे व बराचसा उत्तरेकडे जाणारा असें मानणें भाग आहे. जो मार्ग प्राचीन काळीं अत्यंत प्रसिद्ध होता व ज्याचें वर्णन पुराणांतरी व कालिदासाच्या काव्यांतून आढळतें तो **'अगस्त्य ऋषीचा मार्ग'** ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. गर्वानें फुगलेला विंध्य पर्वत अगस्त्य मुनीपुढें वांकला ह्या पौराणिक कथेचें सार हेंच कीं माळव्यांतून दक्षिणेंत येण्यासाठीं विंध्य पर्वतास एके ठिकाणीं एक मोठी खांच अथवा खिंड आहे. आणि त्या खांचेच्या दक्षिणेस येऊन अगस्त्य मुनीनें आपला आश्रम गोदावरीच्या उत्तरेस स्थापला असें कालिदासाप्रमाणेंच भवभूतीचें व बाणाचेंहि मत आहे असें आमच्या पहिल्या लेखांत आम्ही दाखविलेंच आहे. रघुवंशाच्या तेराव्या सर्गांतील वर्णनावरून तो आश्रम पंचवटीच्या उत्तरेस अथवा उत्तरपूर्वेस असावा असें दिसतें. आणि त्या मार्गानें पुढें गेल्यावर लागणारा आम्रकूट पर्वत ओलांडल्यावर नर्मदा नदी ओलांडावी लागते. ती जागा साधारणपणें खांडव्याच्या सुमारास किंवा अशीरगडच्या पूर्वेस असावी असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. मध्यकाळीं मोगल बादशहांचीं सैन्यें जेथें नर्मदा ओलांडून दक्षिणेंत येत तोच प्रायः प्राचीन मार्ग असावा असें वाटतें. आम्ही या दृष्टीनें वरील प्रदेशाचा अभ्यास केला नसल्यामुळें यांतील तपशिलाविषयीं खात्री सांगूं शकत नाहीं हें प्रांजलपणें कबूल करतों. आम्रकूटाच्या पूर्वीं जें 'माल' अथवा पठार लागतें तें सातपुड्याच्या रागांमधील उंचवट्याचें ठिकाण असावें अशी कल्पना सयुक्तिक होते. 'माल' शब्दाचा सरळ अर्थ माळ अथवा डोंगरमाथ्यावरील पठार असा असल्यामुळें तो छत्तिसगड प्रांताचा भाग असा घेण्याचें मुळींच कारण नाहीं. तसा अर्थ मूळ वुइल्सन नामक आंग्ल पंडितानें पुष्कळ वर्षांपूर्वीं घेतला व छत्तिसगडांतील रतनपुराजवळील माल्डा नामक प्रदेशाशीं त्याचा संबंध जोडला. आम्रकूट म्हणजे अमरकंटक इत्यादि कल्पनासुद्धां त्याच लोकांनीं काढल्या. अर्थात् रामगिरीचें रामटेकशीं ऐक्य साधूं पहाणाऱ्यांना पूर्वींच्या दोनतीन पिढ्यांचे परिश्रम जसें लाभदायक झाले आहेत तसें आमच्या बाजूस कांहीं साधन नाहीं. आम्रकूट पर्वतहि जेथें नर्मदा ओलांडून माळव्यांत शिरण्याचा मार्ग त्याच्या दक्षिणेकडील गिरिशिखर म्हणजे विंध्य पर्वताचाच भाग असें मानणें युक्त होईल.



अनुक्रमणिका

दशार्ण देश, विदिशा नगरी, वगैरे जीं जीं स्थळें कालिदासानें मेघमार्गावर वर्णिलीं आहेत तीं त्याच्या काळीं उत्तरेकडील मार्गावर प्रवास करणाऱ्या सर्व लोकांच्या परिचयाची, समृद्ध व विद्याकलादिसंपन्न अशींच होतीं ह्यांत संशय नाहीं. उज्जयिनी, अर्थातच, त्यांतल्यात्यांत अग्रगण्य होतीं. असणार ह्यांतहि संशय नाहीं. तीं सर्व कविनिर्दिष्ट स्थळें स्पष्ट गमकें समजून त्यांच्या अनुरोधानें मार्गाचें परीक्षण केलें पाहिजे. मालावर आरूढ झाल्यावर 'किंचित्पश्चाद्व्रज', म्हणजे थोडें पश्चिमेकडे वळण घेऊन मग उत्तरेकडे वळ, असें सांगण्यांत कवीचा उद्देश केवळ त्या रस्त्याची दिशा स्वाभाविकपणें तेथें एकदम बदलते, एवढें सांगण्याचाच असावा असें दिसतें. विदिशा नगरीला ती मार्गावर नसतांहि, तूं मुद्दाम भेट दे, असें सांगण्याचा असावा असें वाटत नाहीं. उज्जयिनी मात्र त्या मार्गावर नसतांहि मुद्दाम जाऊन भेटण्यास योग्य अशीच नगरी आहे, तिचें दर्शन न घडलें तर सर्व जन्म व्यर्थ, अशा भावनेनें तो यक्ष त्या नगरीचें माहात्म्य स्पष्टपणें गातो. परंतु ती त्या मार्गावरची नगरी नाहीं हेंहि तो स्पष्टपणें सांगतो. विदिशा त्या मार्गावरील असो वा नसो, आम्ही वर दिलेल्या रीतीनें मेघाचें तिच्यावरून गमन रामशेजच्या बाबतींत पूर्ण जुळतें. कारण जेथें सर्वच मार्ग हवाईमार्गाप्रमाणें निवळ एका दिशेचा नाहीं, परंतु नैसर्गिक अडथळयांमुळें कमजास्त बदलतो तेथें विदिशा रामशेजच्या ईशान्येस असली तरी ती वाटेंत लागणारच. जर ती गोदावरीच्या दक्षिणेस किंवा महेंद्र पर्वताच्या पायथ्याशीं असती तर मात्र पंचाईत झाली असती. त्याचप्रमाणें नेत्रवती, निर्विंध्या, सिंधु, क्षिप्रा, गंभीरा वगैरे माळव्यांतील नद्यांपैकीं कांहीं स्वाभाविकपणें मार्गावर असलेल्या तर कांहीं उज्जयिनीकडील वळणामुळें लागणाऱ्या वर सांगितलेल्या रीतीनें रामटेकइतक्याच रामशेजशींहि जुळतात. कवीहि जेथें दिशा बदलते तेथें ती सांगतोच अशांतलाहि प्रकार नाहीं. कारण ब्रह्मावर्त व कुरुक्षेत्र हीं घेतल्यावर मग तो मेघ हरिद्वारजवळ जेथें गंगा हिमालयांतून बाहेर पडते त्या ठिकाणाजवळ असलेल्या कनखल तीर्थाकडे जावयाचा आहे. आणि हा मार्गहि अगदीं सरळ उत्तरेकडे आहे अशांतला मुळींच भाग नाहीं. प्राचीन काळींच काय, पण अर्वाचीन काळींहि, वायव्य, ईशान्य वगैरे नांवें फारशीं प्रचारांत नसून सामान्यतः पश्चिम, उत्तर, वगैरे नांवेंच व्यवहारांत उपयोजिलीं जात असत व असतात अशाविषयीं अनेक दाखले देतां येतील. इंग्लिश लोक ज्याला उत्तर समुद्र' ( North Sea ) म्हणतात तो कांहीं स्कॉटलंडच्या उत्तरटोकाकडचाच समुद्र नाहीं. कालिदासानेंहि रघूच्या दिग्विजयाचें वर्णन करतांना ज्या देशाचें किंवा लोकांचें पौरस्त्य, औदीच्य म्हणून वर्णन दिलें आहे तेहि 'प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति' ह्याच नियमांत मोडतात; अशी परिस्थिति असल्यामुळें गोदावरीपरिसरांतल्या रामशेजवरून उत्तरेकडे जाणारा मेघ एकदम सरळ उत्तरगामी होतो असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. आणि हें जर खरें, तर थोडें पश्चिमेकडे वळल्यावर समुद्रांत पडण्याची त्याला मुळींच धास्ती नाहीं.

## वाङ्मयीन पुराव्याविषयीं औदासीन्य

रामगिरीचें स्थान ज्या पुराव्यावर निश्चित करावयाचें तो पुरावा म्हणजे 'वन्द्यैः पुंसां रघुपतिपदैरंकितं मेखलासु' आणि जनकतनयास्नानपुण्योदकेषु ( रामगिर्याश्रमेषु ) ' हाच मुख्य होय हें सर्वमान्यच आहे. त्यानंतर मेघास काव्यनायक जो यक्ष– अथवा स्वतः कविच म्हटलें तरी चालेल–त्यानें उपदेशिलेल्या मार्गाचा त्या स्थानाशीं सुसंगतपणा ह्याविषयींहि कोणाचा मतभेद असेल असें वाटत नाहीं. आदिकवि वाल्मीकीपासून तो थेट भवभूतीपर्यंत **दंडकारण्यांतील गोदावरीपरिसरांतील रामनिवास व रामसंचार ह्या दोन पुण्यक्रियांनीं संस्पृष्ट असा प्रदेशच त्याच्याशीं जमतो** हें आम्हीं पूर्वीच्या लेखांत व आतांहि दाखविलें आहे. जनस्थान हा दंडकारण्याचाच एक विशिष्ट भाग हें उत्तररामचरितांतील दुसऱ्या अंकांत जेथें शंबूक रामाची खात्री करतो तेथें अगदीं स्पष्ट सांगितलें आहे. रामाचा प्रश्न 'किं नाम दण्डकेयम्' त्यावर शंबूकाचें उत्तर 'दण्डकैवैषा अत्र किल पूर्वं निवसता देवेन– चतुर्दश सहस्राणि... ... रणे हताः।' आणि त्याप्रमाणें खात्री झाल्यावर रामाचें वचन 'न केवलं दण्डका, जनस्थानमपि।' इत्यादि प्रश्नोत्तरें व इतर वर्णनें वाचून जर कोणाची खात्री झाली नाहीं तर कवीनें म्हटल्याप्रमाणें 'ब्रह्मापि

( तं ) नरं न रंजयति ' असेंच म्हणावें लागेल. भवभूति दक्षिणापथांतील रहिवासी असल्यामुळें त्याला वरील प्रदेशाचें प्रत्यक्ष व उत्कृष्ट ज्ञान होतें ह्याविषयीं कोणाला शंका असेल असें वाटत नाहीं. कालिदास व बाण हेहि भवभूतीशीं पूर्ण सहमत असें आम्ही पूर्वीच्या लेखांत स्पष्ट केलें आहे. स्थिरदेव नामक टीकाकार 'रामगिरिर्दण्डकान्तः प्रसिद्धः' असें म्हणतो. तें रामशेजला पूर्णपणें जमतें. रामटेक दंडकारण्यांत बसलें तरी रामनिवासादी पुण्यक्रियांशीं त्याचा समन्वय बहुतांशीं अनुमानबलावर आहे हें नाकारतां येणार नाहीं. गोदावरीपरिसारांतील पर्वत— अर्थात, जर त्याचा मार्गाशीं विरोध नसेल तर— स्पष्ट निर्दिष्टच मानणें युक्त होईल. आणि त्याच्या उलट रामटेक हा एक प्रकारें अनिर्दिष्ट समजावा लागेल. जटायुशिखर, प्रस्रवण, कुंजवान्, क्रौंचावत वगैरे गोदावरीच्या उगमाजवळचे पर्वत, जनस्थान, पंचवटी, सीतातीर्थ (सीताघाट) वगैरे स्थळें भवभूतीच्या अत्यन्त परिचयाचीं दिसतात. आणि तो परिचय अत्यंत प्राचीन परंपरेवर सुप्रतिष्ठित असल्यामुळें त्याचें महत्त्व कितीतरी पटींनीं अधिक आहे. आणि महाकवींनीं एकमुखानें दिलेला पुरावा सर्वमान्य व सर्वजनसुलभ अशा ग्रंथांतील असल्यामुळें, शिलालेखादि आधार — कीं ज्यांची किल्ली फक्त थोडयाच लोकांच्या हातीं असल्यामुळें सामान्य विद्वानहि त्या कामीं परतंत्र बनतात — त्यापुढें फिके पडतात. ह्याचा अर्थ आम्ही शिलालेखादिक अप्रमाण मानतो असा नव्हे. परंतु त्यांचा पुरावा जर कवींच्या पुराव्याशीं विरोध करूं लागला तर तो गौणच मानावा लागेल. म. म. डॉ. मिराशींचा सर्व भर गुप्तकालीन शिलालेख व तत्प्रतिष्ठित अनुमानपरंपरा ह्या दोहोंवर असल्यामुळें त्या पुराव्याशीं न जमणाऱ्या वाङ्मयीन पुराव्याविषयीं ते स्पष्ट अनादर व औदासीन्य दाखवितात. निरनिराळ्या प्रकारच्या पुराव्याच्या बलाबलाचा तत्त्वनिर्णय करण्याचा हा प्रसंग नव्हे म्हणून आम्ही तो विषय येथेंच सोडून देतों. क्षणभर रामटेकचें रामगिरीशीं ऐक्य मान्य केलें तरी एक प्रश्न अनिर्णीतच राहातो. तो असा कीं त्या ठिकाणचा गोदावरीशीं संबंध कोणत्याहि प्रकारें येत नाहीं. आणि सर्व कवि तर रामनिवासादि क्रियांचा गोदावरीपरिसराशींच संबंध जोडतात. यावर कोणी असें म्हणतील कीं रघुवंशांत कालिदासानें तसें दाखविलें असलें तरी मेघदूतांत गोदावरीचा नामनिर्देश नाहीं. परंतु हें खरें असलें तरी त्यावर दुसरा प्रश्न असा उद्भवतो कीं मग त्याला पूर्वोक्त रामसहवासादि क्रियांची त्या पर्वताशीं मुद्दाम सांगड घालण्याची तरी काय जरूर होती? ती घातली नसती तरी तेवढयानें काव्याला न्यूनत्व येत नव्हतें. अर्थात काव्यरचना करतांना कवीनें मनांत नियुक्त केलेला पर्वत तत्कालीन सर्व शिष्ट जनांच्या मतें जो रामसहवासानें पावन झालेला म्हणून मानण्यांत येईल तोच धरावा लागेल आणि असा ठिकाणा एकच मानावा लागेल व तोहि गोदावरीपरिसरांतर्गतच मानावा लागेल. आणि तसें मानल्यास रामटेकचें माहात्म्य अति प्राचीन नसून ज्या गुप्तकालाचा म. म. डॉ. मिराशी इतका जबरदस्त अभिमान बाळगतात त्या काळांतच त्याची उत्पत्ति झाली असावी असें मानावें लागेल. आणि तें माहात्म्य प्राचीन परंपरेवर अधिष्ठित नसल्यानें इतर माहात्म्यांप्रमाणें बनावटच (Counterfeit) समजावें लागेल.

आमच्या पूर्वीच्या लेखाची जी पुरवणी करण्याची आमच्यावर न्याय्य जबाबदारी होती ती येथें संपली असें मानून भूमितिकारांच्या परिभाषेंत Q. E. D. ( Quod Erat Demonstrandum ' यत्साध्यमासीत्तत्सिद्धम् ) असें लिहून ह्या विषयाची येथें रजा घेतों. फक्त नवीन कांहीं उपलब्धि झाली तरच तिचा विचार करण्याचें अभिवचन नवभारताच्या वाचकांस देतों.

---

श्री. गं. वि. नेर्लेकर

# माधवांची कविता: एक अभ्यास

माधव केशव काटदरे ऊर्फ कवि माधव ३ सप्टें-बर १९५८ रोजीं दिवंगत झाले. निधन समयीं त्यांचे वय ६६ वर्षांचें होतें. लहानपणापासूनच त्यांना कविता करण्याचा छंद होता. गेल्या ५० वर्षांतील मराठी काव्याचा प्रपंच त्यांचे समोरच घडला. आशय व अभिव्यक्ति या दृष्टीनें झालेले बदल त्यांनीं डोळसपणें पाहिलें. याचा परिणाम त्यांच्या काव्यनिर्मितीवर झाला. काव्यरचनेच्या दृष्टीनें त्यांनीं जुन्या व नव्या, दोन्ही पद्धतींचा अवलंब केलेला दिसून येतो. त्यांची एकंदर कविता ७५ च्या आसपासच भरेल. कवि माधव हे कस्टम खात्यांत कारकून म्हणून काम करीत होते, पण कस्टम खात्याच्या रूक्ष व रटाळ वातावरणांत व फायलींत त्यांचें कविमन कधींच रमलें नाहीं. तें सदैव ऐति-हासिक कालांतच वावरत राहिलें. तत्कालीन व्यक्तींशीं व प्रसंगांशीं त्यांचें पूर्ण तादात्म्य होत असे. त्यामुळें मस्तानी, जिवबादादा बक्षी, बापू गोखले, कान्होजी आंग्रे इ० सारखीं व्यक्तिचित्रें सजीव स्वरूपांत वाच-कांच्या पुढें उभी करण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं दिसून येतें. कलेसाठीं त्यांनीं इतिहासाचा विपर्यास क्वचितच केलेला दिसेल. त्यांनीं कोंकणच्या सौंद-र्यानें आपल्या काव्यकामिनीला नटवलें आहे. कोंक-णच्या दंतकथा व लोककथा यांचा मार्मिक उपयोग त्यांनीं आपल्या काव्यांत केलेला आहे. प्रदीर्घ कथा-काव्य रचनेंतील कथनकौशल्य हें त्यांच्या कवितेचं एक वैशिष्ट्य आहे. त्यांच्या एकंदर कवितांपैकीं निम्म्या तरी कविता ऐतिहासिक स्वरूपाच्या आहेत.

## माधवांची उपेक्षा

एकोणीसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत मराठी जीवनांत एक क्रांतीची लाट उसळली. तिचे पडसाद मराठी वाङ्मयांत उमटले. राष्ट्रीय काव्यनिर्मितीला जोरदार सुरवात झाली. अशा प्रकारच्या कवींत कोणी केशवसुतांना अग्रस्थान देतात. पण राष्ट्रिय कवि या दृष्टीनें आद्यकवि म्हणून विनायकाची गणना केली जाणें योग्य होय. विनायकाचा काळ १८७२–१९०९ असा मानला जातो. कै० माधव केशव काटदरे हे त्या दृष्टीनें नंतरचे. दोघेहि राष्ट्रिय कवि म्हणूनच ओळखले जातात, पण त्यांच्यांत थोडा फरकहि आहे, हें सूक्ष्मरीतीनें पाहिल्यास ध्यानांत येते. कवि माधव हे **राष्ट्रिय कवि तर आहेतच पण त्याचबरोबर ते ऐतिहासिक** कवीहि आहेत. राष्ट्रिय कवि म्हणून जी लोकप्रियता कवि विनायक, कवि गोविंद किंवा स्वातंत्र्यवीर सावरकरांना मिळाली, तेवढी माधव कवींना लाभली नाहीं. त्यांची रसिकांकडून उपेक्षाच झाली. त्याला कारणेंहि अनेक आहेत. त्यांची चर्चा शक्यतो पुढील विवेचनांत येईलच. कवि माधव स्वतः प्रसिद्धिविन्मुख होते हें त्यांतील महत्त्वाचें कारण मानतां येईल. मराठी रसि-कांनीं आपल्या आवडत्या कवींचें आवर्जून कौतुक केलें नाहीं, असें नाहीं. पण हें भाग्य माधवांच्या मात्र वाट्यास आलें नाहीं. त्यांची कविता चांगली असू-नहि केवळ प्रसिद्ध करवून घेण्याचें तंत्र न साधल्या-मुळें, कचऱ्याच्या टोपल्यांतच कशी पडून राही, याचें विवेचन कवि माधवांनींच एका लेखांत केलें आहे. तें वाचलें म्हणजे खरोखर वाईट वाटतें. पण जग हें असेंच आहे, त्याला कोण काय करणार !

'मस्तानी' किंवा 'शनिवारवाड्यापुढें' ह्या कविता दर्जेदार आहेत, पण माधवांना अशा कविताहि प्रसिद्ध करण्याकरितां अनेक संपादकांचे उंबरठे झिजवावे लागले. महाराष्ट्राला कदाचित् हा शापहि असेल कीं त्याला कांहीं व्यक्तींची बूज त्यांच्या मृत्यूनंतरच ठेवावी असें वाटूं लागते. माधवांच्या मृत्यूनंतर त्यांच्या काव्याकडे महाराष्ट्राचें लक्ष अधिक रसिकपणें लागलें. निदान् या रीतीनें तरी त्यांच्या कवितेचें गुणग्रहण होऊन योग्य तें श्रेय आपण कवीला दिलें पाहिजे. मुंबई विद्यापीठानें माधवांची कविता २-३ वेळां एम्. ए. च्या विद्यार्थ्यांना अभ्यासावयास ठेवली हें ह्या दृष्टीनें ठीकच झालें. कवि माधवांचें जीवन व त्यांची कविता यांचा अन्योन्य संबंध लक्षांत घेऊन कला ह्या दृष्टीनें त्यांच्या कवितांचें मूल्यमापन करण्याचा अल्पसा प्रयत्न ह्या ठिकाणीं करीत आहे.

## माधवांचें बालपण व शिक्षण

कवि माधवांचा जन्म १८९२ सालीं चिपळूण तालुक्यांत शीर या गांवीं झाला. १९११ सालीं फायनलची परीक्षा पास होऊन ते मुंबईस आले. व कस्टम खात्यांत कारकून म्हणून नोकरीस राहिले. १९४२ सालीं ह्या खात्यांतून ते निवृत्त झाले. गेलीं पंधरा वर्षें त्यांचें वास्तव्य चिपळूणासच होते. मालवणच्या साहित्य संमेलनांत ह्या वृद्ध साहित्यिकाचा सत्कारहि करण्यांत आला होता. १९१० पासून त्यांनीं काव्यलेखनास सुरवात केली व मृत्यूचें बोलावणें येईपर्यंत त्यांचें लिखाण चालूच होतें. त्यांच्या 'हिरवें तळकोंकण' ह्या कवितेमुळें ते प्रसिद्धीस आले. त्यांनीं प्रामुख्यानें ऐतिहासिक कविता लिहिण्याचा प्रयत्न केला. '**मी ऐतिहासिक कविता कशी लिहिली**' ह्या त्यांच्या ज्योत्स्ना मासिकांतील लेखांत, काव्यनिर्मितीकरितां त्यांनीं किती इतिहास संशोधन केलें होतें, ह्याचें विवेचन केलें आहे. ते जसे कवि होते, तसेच चिकित्सक इतिहाससंशोधकहि होते. गुप्तकालीन सामाजिक स्थितीवर त्यांनीं चांगलाच प्रकाशझोत टाकला आहे. 'सत्याश्रय पुलकेशी' ही त्यांची शेवटची कविता होय. तिचें स्वरूपहि ऐतिहासिकच आहे. एकीकडे सरकारी नोकरीचा काच, अधिकाऱ्यांचा जाच, असें असतांनाहि आपल्या मनांतील ऊर्मी प्रगट करण्याचें कार्य माधवरावांनीं उत्तम साधलें. इतिहासाबद्दल त्यांच्या मनांत वसत असलेला जाज्वल्य अभिमान सरकारी बंधन पाळूनहि त्यांनीं मोठ्या कौशल्यानें व्यक्त केला. कवि विनायक किंवा कवि गोविंदाप्रमाणें प्रखर देशाभिमान व्यक्त करण्याचें व स्वातंत्र्य प्राप्तीस्तव ललकारी ठोकण्याचें कार्य माधवांनीं ज्वलज्जहालतेनें केलें नाहीं हें मान्य करूनहि असें म्हणतां येईल कीं ऐतिहासिक व्यक्तींना त्यांच्या भाव-भावनांसह समूर्त करण्याचें कलात्मक सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं अधिक दिसतें. कालाच्या उदरांत गडप झालेल्या, शत्रू, मित्र, शूर, नाहान भ्याड, लढवय्या अशा अनेक व्यक्ती त्यांनीं साकार केल्या. त्यांच्या कवितांत विजयाचे तसे पराभवाचेहि प्रसंग आहेत. 'गोकलखाँ लडनेवाला' ही कविता पराभवाच्या प्रसंगावरीलच आहे. तरीहि तिच्यांतील भावसौंदर्य मनाला भारून टाकणारें आहे. कालाला भेदून त्यांतला जिवंतपणा जाणवेल अशा व्यक्ति-प्रसंग चित्रणांत माधवांचें कौशल्य दिसून येतें.

## काव्यरचनेंतील विविधता

माधवांनीं राष्ट्रीय व ऐतिहासिक काव्य-रचना केली, तशी कोंकणांतील रम्य निसर्गाची वर्णन करणारी कविताहि केली. ऐतिहासिक घटनांत दडलेलें उत्कट भावसौंदर्य त्यांना जसें दिसलें, तसें कोंकणांतील निसर्ग सौंदर्यानें त्यांचें मन मोहरून गेलें याचा प्रत्यय त्यांच्या हिरवेतळ कोंकण, कुरडू, सोनावळ, सखेंळ सबळ आंगरे आदि कवितांत येईल. त्यांच्या कवितेची तिसरी शाखा म्हणजे विनोदी कविता. खेडयांतील जीवन व त्यांतील विक्षिप्त व्यक्ती यांना

सचित्र करण्याचा प्रयत्न अशा कवितांत केला आहे. कै. रविंद्रनाथांच्या कांहीं कवितांचीं व वेदांतील कांहीं ऋचांची त्यांनीं उत्कृष्ट भाषांतरें केली आहेत. थोडक्यांत असें स्पष्ट दिसतें कीं माधवांची कविता जीवनाच्या विविधांगांना स्पर्शून गेली आहे. प्राचीन काळापासून तो वर्तमानकालापर्यंत त्यांची प्रतिभा झेंपावत आलेली दिसते. त्यांची एखादीच कविता आत्मनिष्ठ स्वरूपाची असून बाकी बहुतेक कविता वस्तुनिष्ठ ( objective ) स्वरूपाची आहे. कांहीं कवितांत माधवांनीं आपली काव्यविषयक मतें व्यक्त केलीं आहेत. त्यांच्या या मताधारेंच त्यांच्या कवितांचा विचार करणें इष्ट ठरेल. म्हणून त्यांचीं काव्यविषयक मतें प्रथम पारखून घेतलीं पाहिजेत.

## माधवांची काव्यविषयक भूमिका

माधव स्वतःचा उल्लेख कवि म्हणून न करतां **शाहीर** असा करतात. शाहीरगिरी ही चैतन्याची ऊर्जस्वल दिव्यझरी आहे असें त्यांचें मत होतें. काव्य म्हणजे कवीचें हृदयोद्भव गान या सर्वमान्य होणाऱ्या काव्यविषयक जाणिवेबरोबरच 'आपणांस शाहीरांची परंपरा पुढें चालवावयाची आहे, शाहीराचें गीत म्हणजे रंडागीत नव्हे, देशास्तव ज्यांनीं आत्मसमर्पण केलें त्यांच्या गुणगानास्तव शाहीरांचें कवन आहे !' अशा प्रकारचे विचार माधवांनीं कांहीं कवितांतून मांडले आहेत व त्यांतून त्यांची काव्यविषयक भूमिका स्पष्ट होते. माधवांनीं कविता ही **चैतन्यनिर्मितीची साधनशक्ति** आहे असें गृहीत धरलें होतें. केवळ कला किंवा 'करुनियां काव्य मनांत गुंगतें' ही भूमिका माधवांना मान्य नव्हती. कलादृष्ट्या सुंदर ठरणाऱ्या कांहीं कविता माधवांनीं लिहिल्याहि आहेत, परंतु काव्यप्रयोजनांत माधव कवि कवितेला साधनरूप मानतात यांत तिळमात्र शंका नाहीं. कविता साधन मानली कीं विशिष्ट ध्येयाचा पुरस्कार करण्यांतच तिची शक्ति खर्ची पडते. तिला प्रासंगिक स्वरूप प्राप्त होते. एखादाच असा प्रतिभासंपन्न निघतो कीं जो तात्कालिकांतील तात्कालिकत्व व त्यापाठीं दडलेलें शाश्वतरूपीं अथांग मानवी जीवन यांचा कौशल्यानें समन्वय घडवून आणूं शकतो कीं ज्यामुळें प्रासंगिकालाहि चिरंतनत्व प्राप्त होतें. कवि माधवांच्या कवितांत असें कांहीं झाले आहे कां हें पहाणें आवश्यक आहे. दुसरें असें कीं काव्य हें हृदयाचें गान आहे असें जेव्हां माधव कवि लिहितात तेव्हां काव्यस्वरूपाविषयीं ते मोठा विचार सांगतात यांत शंकाच नाहीं. परंतु स्वतःच्या अंतःकरणांतील भावभावनांना-गानाला कवि माधवांनीं महत्त्व दिलें नाहीं असें दिसतें. आपलें व्यक्तित्व समष्टींत मिळवूनच त्यांनीं विचारप्रकटीकरण केलें. यामुळें भावकविता त्यांच्या कवितेंत कमीच आहे. परंतु जीवनांतलें रोमहर्षक प्रसंग, कल्पनासृष्टींत प्रत्ययाला येणारे सौंदर्यपूर्ण जग, निसर्गांतून जाणवणारें उत्कट सौंदर्य यांवर माधवांनीं कविता लिहिली आहे. ती उत्कट व सुंदर ठरेल अशी आहे. माधवांच्या ऐतिहासिक कवितेंचें मूल्यमापन प्रथम करणें योग्य होईल.

## ऐतिहासिक कविता

त्यांच्या ऐतिहासिक कवितांत शिवकालावर ४ व पेशवाई कालावर २० कविता आहेत. यांत तारापुरचा रणसंग्राम, शाहुराजाचा उमराव, मस्तानी, जिवबादादा बक्षी, गोकलखॉं, शनिवारवाड्यापुढें इ० उत्तम कवितांचा समावेश होतो. माधवांनीं ऐतिहासिक कविता लिहितांना इतिहासांतील नाट्यपूर्ण प्रसंगांची निवड केली आहे. पण माधवांची सर्वच ऐतिहासिक कविता राष्ट्रीय स्वरूपाची मानतां येईल कां ? याचा विचारहि केला पाहिजे.

## राष्ट्रीय व ऐतिहासिक कविता

राष्ट्रीय काव्य व ऐतिहासिक काव्य यांत काव्यदृष्ट्या थोडासा फरक आहे. राष्ट्रीय काव्य व त्याचें स्वरूप या विषयांवर आतांपर्यंत अनेक विद्वानांनीं आपले विचार मांडले आहेत. आपल्या राष्ट्राचें

पूर्ववैभव गाणारें, नवीन पराक्रमास प्रोत्साहन देणारें, पारतंत्र्याबद्दल खेद प्रदर्शित करून स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नास प्रवृत्त करणारें काव्य म्हणजे राष्ट्रीय काव्य अशी कल्पना प्रा. रा. श्री. जोग यांनीं मांडली आहे; तर श्री. माडखोलकर यांच्यामतें राष्ट्रीय भावना उद्दीपित करणारी कविता ती राष्ट्रीय कविता होय. त्यांच्यामतें तुतारी सारखी सामाजिक कवितासुद्धां राष्ट्रीय कविताच होय. ज्या कवितेच्यामागें जिवंत व स्वतंत्र राष्ट्राचें गुणधर्म उभे असतात तिला राष्ट्रीय काव्य म्हणावें असेंहि कांहीं विद्वानांचें मत आहे. माझ्यामतें राष्ट्रीय काव्याच्या निर्मितीचेंप्र योजनच मर्यादित असतें, म्हणून तिची विपुल निर्मिति ठराविक काळांतच होते. ऐतिहासिक घटनांचा वा प्रसंगांचा उपयोग करून त्यांच्या निमित्तानें आजची परिस्थिति, वातावरण यांची वाचकांना ओळख करून देऊन त्यापासून आपण बोध काय घ्यावयाचा हें सूचित करणें राष्ट्रीय काव्याचें स्वरूप होय. ऐतिहासिक कवितेचें प्रयोजन यापेक्षां थोडसें वेगळं आहे. **ऐतिहासिक कवितेंत ऐतिहासिक घटना साधनस्वरूप न राहतां साध्य बनतात.** कवि माधवांनीं राष्ट्रीय कविता लिहिली आहे, तिचें स्वरूप मर्यादित आहे; पण **अनुलेखानें टाळावें इतकें मात्र त्यांचें काव्य जुजबी नव्हतें हें** टीकाकारांनीं लक्षांत घ्यावयास हवे. त्यांच्या ऐतिहासिक काव्यरचनेमुळें त्यांचें मराठी कवींतील स्थान निश्चित झालें आहे. ऐतिहासिक कवितेंत **राष्ट्रीय काव्याचें प्रयोजन** असून त्यांत आणखी असें कांहींतरी असतें कीं ज्यामुळें तिला पृथगात्मता प्राप्त होते. विनायकांची कांहीं कविता ऐतिहासिक स्वरूपाची आहे हें लक्षांत घेऊनहि असें म्हणतां येईल कीं त्यांची पुष्कळशी कविता राष्ट्रीय स्वरूपाची आहे. तिचें स्वरूप स्फूर्तिगानाचें आहे. राष्ट्रीय काव्याला बहर विशिष्ट काळांतच येतो. ही कविता साधन म्हणून योजिली जाते. साधन म्हणून कलेचा ज्यावेळीं उपयोग केला जातो त्यावेळीं सहाजिकच ती शाश्वततेचा विचार न करतां परिस्थितींतल्या विशिष्ट संदर्भाला महत्त्व देऊं लागते. तिचें स्वरूप मर्यादित होतें. तिच्यांतील संदर्भ परिस्थितीनुरूप बदलणारा असल्यामुळें, तें तें वातावरण नाहींसें झालें कीं अशा राष्ट्रीय कवितेंतील जीव हरपल्यासारखा वाटतो. ओहोटी आली कीं नाव वाळूंत रुतावी व भरती आली कीं पुन्हां तरंगावी त्याप्रमाणें परत तसें वातावरण निर्माण झालें कीं राष्ट्रीय कवितेंत जीव आल्यासारखें वाटतें. पराक्रमी पुरुषांचें गुणगान, युद्धांचें वर्णन, ऐतिहासिक स्थळांकडे पाहून वाटणारा हर्षखेद, पारतंत्र्याबद्दलची चीड, सामाजिक दोषदर्शन या व अशा विषयांवर राष्ट्रीय कविता आपली गुजराण करीत असते. ह्या विषयांतील जिव्हाळा शाश्वत स्वरूपाचा नसतो. त्यामुळें राष्ट्रीय कवितेला मर्यादा पडतात. तिला साचेबंद स्वरूप प्राप्त होऊन कधीं बोधपर सूर तर कधीं हुरहूर ऐकूं येते. राष्ट्रीय कवितेच्या सामर्थ्यांतील कच्चेपणा व मर्यादा या स्वरूपाच्या आहेत.

### ऐतिहासिक व राष्ट्रीय कवितेला — शाश्वतमूल्य कधीं प्राप्त होतें

हरपलेल्या ऐतिहासिक वातावरणाच्या निर्मितीच्या आधारें कवि जेव्हां विशिष्ट मूड व्यक्त करतो, तेव्हां नकळत तो भावकवितेजवळ येऊं लागतो इतकेंच. जंजिरे विजयदुर्ग ऊर्फ घेरिया ही कविता वर्णनपर तर खरीच पण तिच्यांतहि असा एक मूड कवीनें निर्माण केला आहे कीं ज्यामुळें तिची **आवाहनाची शक्ति व कक्षा** केवळ वर्णनपर कवितेपेक्षां अधिक ठरावी. इंग्रेजी कदम किंवा जिवबादादा बक्षी या कवितांत हें सामर्थ्य दिसत नाहीं. जीवनांतील विलक्षण नाट्याचें दर्शन ज्यावेळीं एकाद्या प्रसंगांत ( सोहराब व रुस्तुम या कथेंतील प्रसंगाप्रमाणें ) असून सबंध मानवी मनाला आकृष्ट करील अशी ताकद त्या प्रसंगांत असते, तेव्हां मात्र ती ऐतिहासिक कविता ऐतिहासिकता न गमवतां कालातीत होऊं शकते

ऐतिहासिक व राष्ट्रीय काव्याच्या मर्यादा आपण पाहिल्या. ऐतिहासिक व्यक्ति वा मानचिन्हें यांचें गुणगान करून स्फूर्ति निर्माण करण्याचें कार्य ही कविता करीत असतांनाच ती जेव्हां व्यापक आवाहन करणारी असते तेव्हां तिच्यांतील व्यक्ती केवळ ऐतिहासिक न रहातां त्या मानवी जीवनांतील व्यापक भावप्रवाहांत उतरतात व त्यांना प्रतिकात्मक ( Symbolic ) स्वरूप प्राप्त होतें. परंतु एक गोष्ट ध्यानांत धरली पाहिजे—ती म्हणजे ऐतिहासिक व्यक्तीला स्वत:-चें इतिहास-सिद्ध असें विशिष्ट स्वरूप प्राप्त झालेलें असतें, त्यामुळें तिचें मनोविश्लेषण करतांना ऐतिहासिकतेला अन्याय होण्याची शक्यता असते. किंवा धक्का न लावतां करणें अवघड असतें. याच कारणानें ऐतिहासिक मोठी व्यक्ति कादंबरीच्या नायकस्थानीं सहसा येत नाहीं वा ती आली तर विषयाला मर्यादा निर्माण करते. उष:काल कादंबरी शिवशाहीचा उत्कर्ष दर्शविणारी असली तरी शिवाजीला कादंबरीचा नायक न करितां नानासाहेबास नायकत्व देण्यांत हरिभाऊंनीं औचित्यच दाखविलें आहे. म्हणून हीच दृष्टि समोर ठेवून असें म्हणतां येईल कीं ऐतिहासिक कवितेंतील व्यक्ति ज्यावेळीं व्यापक आवाहन करतात, त्यावेळीं ऐतिहासिक पोलादी कक्षेंतून त्या बाहेर पडतात; पण ऐतिहासिकत्वाला बाध न आणतां रसिकाच्या मनांत सहसंवाद निर्माण करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत निर्माण होतें. मस्तानी ही कविता आजहि मन हलवून टाकतें, याचें कारण हेंच देतां येईल. ती कविता शाश्वत प्रेमविषयाला आवाहन करणारी असल्यामुळें वाचकांच्या मनांत बाजीराव-मस्तानी यांना ' प्रियकर प्रेयसीचें स्थान प्राप्त होतें.' आपल्याच भावजीवनाचें अंग ती कविता बनूं लागते. तेव्हांच ऐतिहासिक कवितेला शाश्वत मूल्यांचें स्वरूप प्राप्त होऊं लागतें. माधवांची 'मस्तानी' बीची कमळा 'गडकऱ्यांची' ' कृष्णाकांठीं कुंडल ' ह्या कविता आजहि आवाहन करणाऱ्या ठरतात. याचें कारण हेंच देतां येईल. तथापि एक गोष्ट ध्यानांत धरली पाहिजे ती म्हणजे मस्तानीसारखी स्त्री ऐतिहासिक असली तरी बाजीरावाचें सिद्ध ऐतिहासिक व्यक्तित्व व मस्तानीचें व्यक्तित्व यांत फरक आहे. मस्तानीभोंवतीं दंतकथा, प्रणयकथा व चमत्कृतींचें वलय निर्माण झालें आहे. तिच्याविषयीं जी गूढता व अस्पष्टता शिल्लक राहिली त्यामुळें मस्तानीचें व्यक्तित्व अधिक लवचिक बनलें. त्यामुळें लेखकाला चित्रणाला हवें तसें स्वातंत्र्य मिळालें. हीच कविता बाजीराव मस्तानीला उद्देशून लिहितो आहे या धाटणीनें लिहिली असती तर तिच्यावर एवढ्या मर्यादा पडल्या असत्या कीं बाजीरावाच्या व्यक्तित्वाशी फाजील स्वातंत्र्य घेतल्याचा ठपका लेखकावर आला असता.

## माधवांच्या ऐतिहासिक कवितांचें मूल्यमापन

वरील विवेचन लक्षांत घेतलें तर माधवांच्या कांहीं कविता कलादृष्ट्या समर्थ ठरतात. इंद्रोजी कदम, गोकलखाँ, जिवबादादा ह्या कविता ऐतिहासिक व्यक्तींवर असूनहि त्यांचें सामर्थ्य मर्यादित ठरतें. विषयाला ऐतिहासिकतेची मर्यादा असूनहि माधवांनीं कांहीं कवितांत चिरंतनत्व आणलें आहे. ' शनिवारवाड्यापुढें ' या कवितेंत कवीची शोकाची भावना इतक्या प्रभावानें मिसळते कीं न कळत ती कविता वाचकांच्या मनांत **हरपल्या श्रेयाची भावना** निर्माण करून जाते. जंजिरे विजयदुर्ग ऊर्फ घेरिया या कवितेभोंवतीं उत्तर–पेशवाईतील वैभवाचें वातावरण रेंगाळतांना दिसतें, परंतु कविताविषय एकाद्या निसर्गकवितेंतील तपशीला प्रमाणें ताजा वाटतो. सागराच्या पार्श्वभूमीवर रेखाटलेल्या किल्ल्याचें, व निसर्गाचें चित्र, माधवांनीं एवढ्या कौशल्यानें रेखाटलें आहे कीं एक रुचिर भाववृत्ति निर्माण करण्यांत कविता यशस्वी ठरते. ' शाहूराजाचा उमराव ' व त्याचा दरारा वाचकांच्या मनांत घर करून रहातो.





अनुक्रमणिका

'तारापूरचा रणसंग्राम' या विषयांतच विलक्षण नाट्य भरलेलें आहे. तें नाट्य कवि अशा कौशल्यानें उभें करतो कीं वर्तमानाची जाणीव नाहींशी होऊन वाचक त्या काळाशीं समरस पावून तें दृश्य साग्र-संगीत स्वरूपांत पाहूं लागतो. तुडुम, तुडुम ह्या पहिल्या ओळीच्या नादानेंच युद्धाचें वीरश्रीपूर्ण पण चित्त थरारून टाकणारें वातावरण निर्माण होतें व इतिहासजमा झालेलें समरप्रत्यक्षाचें रूप घेऊन पुढें उभें ठाकतें. नाट्यमयतेनें विस्मयाची भावना निर्माण होते, वीरश्री चढते व आपल्याच पूर्वजांचा पराक्रम असल्यानें अभिमानाचें भरतें येतें.

## मस्तानी व मोऱ्यांची मोहना

माधवांची अनेक रसांत न्हाऊन निघालेली कविता म्हणजे मस्तानी होय. त्यांत वीररस, भयानक, शृंगार, करुण अशा अनेक रसांचें सुंदर संमिश्रण झालेलें आहे. ती ऐतिहासिक तर आहेच पण या कवितेंत ऐतिहासिक काल भेदून पलीकडे झेप घेण्याच माधवांचें सामर्थ्यहि दिसून येतें. बाजीरावावर नितांत प्रेम करणाऱ्या मस्तानीच्या मनांतील भावतरंग माधवांनीं हृदयस्पर्शी रीतीनें टिपले आहेत. बाजीरावाची पहिली भेट, दृष्टादृष्ट, प्रेम-समर्पण, मस्तानीचें बाह्य सौन्दर्य, पुण्यांतील तिची वागणूक, विरह वगैरेचें वर्णन वाचकांचें मन मोहून टाकतें. त्यांची पहिली भेटच कवीच्या शब्दांत पाहाण्यासारखी आहे.

"प्राशित होती, 'होती द्रवमय माणिक' सोनेरी सांज
अंगावरती चढवुन सारा सोनेरी साज !
सोनेरी किरणांत तियेच्या चमकावित भाला
दिल्हयी, दिल्पाक मोहरा दख्खनचा आला !"

तिच्या सौंदर्याचें तसें तिच्या वीरत्वाचेंहि वर्णन कवीनें केलें आहे.

"ओळखिली तूं अजुन न पुरती परंतु मस्तानी
हें बुंदेली, नव्हे दिखाऊ दख्खनचें पाणी।"

अशा शब्दांतच ती ताईबाईला सांगते. मस्तानीच्या रूपसौंदर्यानें व भावसौंदर्यानें ह्या कवितेला बरेंच उच्च स्थान प्राप्त झालें. असाच प्रेमाचा चिरंतन विषय असूनहि 'मोऱ्यांची मोहना' सारखी कविता अयशस्वी ठरते; ती, तिच्यांत आलेल्या चमत्कृतीमुळें व आस्वाद्यता प्राप्त न होणाऱ्या अद्भुत कलाटणीमुळें. 'पानपतचा सूड,' छत्रपतींचें पत्र, 'शिवकालीन रायगड' इ. कविता ठराविक सांच्याच्या असून त्यांचें स्वरूप ऐतिहासिक काव्यघाटणीपेक्षां राष्ट्रीय कवितेकडे अधिक झुकणारें वाटतें. काव्यदृष्ट्या ह्या कविता कमी दर्जाच्या वाटतात.

## माधवांच्या अन्य यशस्वी कविता

इतिहासाला भेदून पलीकडे जाण्याचें सामर्थ्य माधवकवींत कसें आहे याचा विचार झाला. आतां त्यांच्या ऐतिहासिक कवितांशिवाय इतर कांहीं यशस्वी कवितांचा परामर्ष घ्यावयाचा आहे. अशा कवितांत हिरवें तळ कोंकण, संत तुकाराम व एका रात्रीची गंमत या तीन कविता प्रमुख होत. पहिली निसर्गपर असून दुसरींत करुणरसपूर्ण अशा जीवननाट्याचें चित्रीकरण आहे. तिसरी अद्भुतरम्य स्वरूपाची आहे. 'हिरवें तळकोंकण' ही कविता म्हणजे केवळ निसर्गांतील तपशील टांचण करून शेजारीं शेजारी मांडून ठेवला आहे, अशी जर कोणाची कल्पना असेल तर ही कविताच त्याला समजली नाहीं असें म्हणावें लागेल. विविध ऋतूंत विविध विलासांनीं क्रीडा करणाऱ्या रंगरूपगंधाच्या संवेदनांनीं बहरून जाऊन रसक्रीडा करणाऱ्या, कोंकणच्या मदालस वनश्रीचें लावण्यपूर्ण व कलारूप चित्रण म्हणजे ही कविता होय. निसर्गांतील सारा तपशील सजीव करून कवीनें त्याच्यांत जें भावस्पर्शी नातें निर्माण केलें आहे, त्यामुळें सबंध निसर्गवर्णनाची एक सौंदर्याकृति निर्माण होते व भावनेनें सुगंधित होऊन जाते. त्या निसर्गांत जादूची पांवरी वाजविणाऱ्या पुष्पवनांतील परी आहेत, आंवळी, जांभळी, शेंवरी या खेळकर

मैत्रिणी आहेत, त्याचबरोबर शिताबाईच्या हातचे गोड पोहे, रागानें दूर फेंकून देणारा बाईलवेडा कवडाहि आहे. आंबा, चिंच रातांबीहि आहेत. पण त्यांच्यांत गोड नात्याचें एक विश्व कवीला सांपडतें. रातांबी नदीकिनारीं जाऊन राहिली आहे कारण — आंब्यानें तिला चकवून चिंचेशीं प्रेमालाप चालविले आहेत. हा अपमान कोणत्या मानिनीला सहन होईल ?

"कोठें चिंचेवर शठ आंबा करी शीतल सांउली
म्हणुनि कोपुनी नदी किनारीं रातांबी राहिली"

ह्या ओळींतील गोडवा पहाण्यासारखा आहे. केवळ वर्णनपर असें स्वरूप न राहतां, सबंध तपशील ताजा, जीवंत बनतो, भावनेंत व सौंदर्यांत न्हाऊन निघतो. त्या त्या तपशीलाचें व्यक्तित्व जीवंत करून व मनोरम कल्पनेनें नटवून कवि जेव्हां शब्दांकित करतो, तेव्हां मन आल्हादून जातें. मानवी जीवनांतील भावप्रधान गोडवा निसर्गांतहि कसा नांदतो हें माधवांच्याच शब्दांत पहाण्यासारखें आहे.

"लज्जारंजित नवयुवतीच्या कोमल गालांसम
रंगुनि काजू, भरले त्यांनीं गिरिडोंगर दुर्गम.
तिथें मंडलाकार मनोहर नर्तन आरंभुनी
रुसल्या सखिची धुमत पारवा करतो समजावणी !"

निसर्गांत मानवी भावनांची अनुभूति घेणारे माधवकवि आपल्या कवितांत अद्‌भुतकथांचा, लोककथांचा कौशल्यानें उल्लेख करून तिच्या रसास्वादांत वेगळीच लज्जत आणतात. त्याचा प्रत्यय —

" झिम्मा खेळे कोंकणचा तो नृपाळ म्हणती मुली
" गळे वसंतीं टपटप जेव्हां आंब्याची डहाळी !"

अशा ओळींतून येतो. शिताबाईच्या गोड पोह्यांचा उल्लेख वर आलाच आहे. परीकथांचें मोहक वातावरण असलेली, 'एका रात्रीची गंमत' सारखी कविता मराठींत दुर्मिळच. अद्‌भुताला वास्तव करण्याचें व कल्पनारम्य वातावरण आस्वाद्य करण्याचें माधवांचें कौशल्य अशा कवितांत प्रामुख्यानें प्रत्ययाय येतें. 'आटपाट नगरांतील' कहाणी ही अशीच चमत्कृतिरम्य कविता आहे.

## संत तुकाराम

संत तुकाराम ही कविता म्हणजे अंतःकरण पिळवटणाऱ्या प्रसंगाचें प्रत्ययकारी आविष्करण आहे. खवळलेला दर्या, तुफानी वादळ, दगडांच्या वर्षावासारखा कोसळणारा पाऊस आणि दर्यावरल्या राक्षसी लाटांच्या तडाख्यांत सापडलेली बोट, प्रत्यक्षांत जाणवावींत अशा प्रभावानें माधवांनीं उभीं केलीं आहेत. निसर्गमानवांतील अखंड चालू असलेले कारुण्यपूर्ण समर, ह्या कवितेंत सुमूर्त झालें असल्यानें कवितेचा आशय व्यापक व सखोल बनतो. त्या भयानकतेंत कवीनें अद्‌भुताची छटा मिसळवून निळावंतीला एका दुष्ट चेटकिणीचें स्वरूप प्राप्त करून दिलें आहे. कवि माधवांच्या कल्पकतेचें हें द्योतक आहेच, परंतु प्रसंगांतलें नाट्य कसें उत्कट करावें याचीहि साक्ष तें देईल. भजन करणारा तुकया, त्याची भक्ति, विरक्ति, आर्तता इ. विविध भावछटा उत्तम रंगून अनेक रसांचें संमिश्रण कवीनें साधलें आहे. रसपूर्ण आशयाप्रमाणें कवितेचा आविष्कारहि कलापूर्ण आहे. समुद्राच्या लाटांचें हेलकावणें जाणवावें अशी लयाची जाति शोधणें कलादृष्ट्या स्तुत्यच आहे. ओळीचा एक तुकडा संपतो, तों त्याचा हेलकावा पुढल्या तुकड्यावर चढतो व तिसऱ्या तुकड्यावर उतरतो. पाणी हेलावून लाट निर्माण व्हावी व ती पुन्हां खाली यावी तसा लय हेलावतो. 'बोटीचा झाला — रज्जुविण — पाळणाच आज' अशा ओळी वाचतांना त्याचें प्रत्यंतर येतें. माधवांच्या ह्या कविता त्यांच्या संग्रहांतच काय पण मराठी कवितेंत स्वतःच्या तेजानें चमकून दिसतील, या विषयीं शंकाच नाहीं.

## अर्वाचीन मराठी कवींत माधवांचें स्थान

कवि माधवांच्या राष्ट्रीय, ऐतिहासिक व इतर कवितांचा सांगोपांग विचार केल्यानंतर आपल्या

लक्षांत सहज येईल कीं माधवांनींहि काव्यदेवतेची आराधना यथासांग केली आहे. पण दुःखाची गोष्ट अशी आहे कीं ज्या ज्या वेळेस राष्ट्रीय कवितेचा व कवींचा उल्लेख केला जातो, त्या त्या वेळेस माधवांचा उल्लेख टाळण्याकडेच आमच्या टीकाकारांची प्रवृत्ति दिसून येते. माधवांनीं राष्ट्रीय स्वरूपाची कविता तर लिहिली आहेच, पण ऐतिहासिक कविताहि त्यांनीं लिहिली आहे. त्यांच्या पुष्कळशा कवितांत राष्ट्रीय व ऐतिहासिक यांचें संमीश्रणहि उत्तम प्रकारें साधलेलें आहे. ऐतिहासिक प्रसंगांचा उपयोग केवळ साधन म्हणून न करतां साध्य म्हणून झालेला आहे. कवि माधवांनीं राष्ट्रीय काव्य स्वरूपाची रचना तर केलीच पण तिथेंच न थांबता माधवकवींनीं पुढें जाण्याचा प्रयत्न केला हा माझ्या विवेचनाचा मुख्य आशय आहे, हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. राष्ट्रीय कवितेला परिस्थितीनुरूप कशा मर्यादा पडतात हें मी वरतीं स्पष्ट केलेंच आहे. पण ह्या मर्यादा ओलांडून जाणारी व व्यापक आवाहन करणारी कविता निर्माण होऊं शकते कीं नाहीं ह्याविषयीं कांहीं विचार मांडण्याचा प्रयत्न येथें केला आहे. त्यांच्या कवितांतील आशय ऐतिहासिक तर आहेच पण तिचे आवाहन व्यापक स्वरूपाचें आहे. माधवांच्या कवितेंत प्रसाद असून नादमाधुर्यहि भरपूर आहे. शब्द व अर्थ यांचा सुंदर मेळ त्यांच्या काव्यांत दिसून येतो. त्यांची वर्णनशैली कथनकौशल्य वाखाणण्यासारखें आहे. माधवांनीं विविध प्रकारची काव्यरचना केलेली आहे. माधवांच्या काव्याचा अभ्यास व त्याचें काव्यदृष्ट्या मूल्यमापन करण्याचा हा अल्पसा प्रयत्न आहे. अर्वाचीन मराठी कवींत कवि माधवांचें स्थान बरेंच वरचें आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नसावा, असेंच त्यांच्या काव्याचें स्वरूप आहे. त्यांच्या कवितेची उपेक्षा करण्यांत मराठी रसिकानें फारच मोठी चूक केली असें म्हटल्यास तें वावगें ठरणार नाहीं. ते जसे शाहीर होते तसेच श्रेष्ठ दर्जाचें कवीहि होते.

---

श्री. भा. पं. बहिरट

# स्पिनोझा

स्पिनोझा हा इ. स. च्या १७ व्या शतकांत होऊन गेलेला फार थोर पाश्चात्त्य तत्त्वज्ञ होता. त्याच्या शिकवणुकी प्रमाणेंच त्याचें जीवनहि स्फूर्तिपद आहे. तो तत्त्वज्ञ होता एवढेंच नव्हें तर, त्याच्या ठिकाणीं उदात्त शील, स्वतःच्या विवेकास पटलेल्या तत्त्वाविषयीं कणखर निष्ठा व स्वातंत्र्याची प्रीति यांचा त्रिवेणी संगम झालेला होता. तो जातीनें ज्यू होता. जातीकरितां व त्यानें मांडलेल्या सिद्धांताकरितां त्याचा छळवाद झाला. परंतु अभंग धैर्य राखून त्यानें संपत्तीची, मानाची व सवंग लोकप्रियतेची पर्वा केली नाहीं. आपल्या तत्त्वांपासून रतीमात्रहि न ढळतां निर्भयपणें त्यानें गरीबी व एकांतवास पतकरिला. मोजकेच पण महत्त्वाचें ग्रंथ लिहिले. कांहीं जिव्हाळयाच्या अशा मोजक्या स्नेह्यांनीं तात्त्विक चर्चा पत्रद्वारें केली. त्यास शांतपणें मार्मिक उत्तरें लिहिलीं. त्याच्या स्वतःच्या हयातींत त्याच्या तत्त्वचिंतनाची महती आकलन केली गेली नाहीं. त्याच्या विचाराची पातळी नीट न समजल्यामुळें त्याच्याविषयीं अनेक गैरसमज निर्माण झाले. नोव्हालिस या जर्मन कवीनें "ईश्वरी प्रेमानें उन्मत्त असलेला तत्त्वज्ञ" असें नामाभिधान ज्या स्पिनोझास दिलें, त्याची अवहेलना त्याच्या हयातींत एक भयंकर नास्तिक विचाराचा मनुष्य म्हणून झाली. स्पिनोझाच्या पश्चात् सुमारें एक शतकानें त्याच्याविषयीं आदरभाव उत्पन्न होऊन त्याच्या ग्रंथांचा अभ्यास आस्थेनें होऊं लागला. प्रख्यात जर्मन कवि गटेनें त्याजवर स्तुतिसुमनें उधळलीं. कोलरिजनें स्पिनोझाच्या "नीतिशास्त्र" या ग्रंथाची गणना बेकनच्या "विद्येची अभिवृद्धि" व कँटच्या "शुद्धबुद्धीची मीमांसा" या श्रेष्ठ ग्रंथांच्या मालिकेंत केली. मॅथ्यू अर्नोल्ड सारख्या संयमशील व चोखंदळ लेखकानें आपल्या "बायबल व स्पिनोझा" या लेखांत म्हटलें आहे कीं प्लेटोनंतर इतका स्फूर्ति देणारा व आदरणीय असा तत्त्वज्ञ दुसरा झाला नाहीं. चालू काळांत स्पिनोझाचें स्थान प्लेटो, कँट, हेगेल, ब्रॅडले यांच्या सारख्या श्रेष्ठ तत्त्वज्ञांच्या मालिकेंत अढळ होऊन त्याच्याविषयीं आदरभाव प्रकट होत आहे.

## स्पिनोझाचें जीवन

सोळाव्या शतकाचे अखेरीस स्पेन व पोर्तुगाल देशांत होत असलेल्या छळास कंटाळून तेथील ज्यू लोकांचे जथे हॉलंड देशांत यावयास सुरवात झाली. त्यांपैकीं पहिला जथा इ. स. १५९३ मध्यें अमस्टरडॅम मध्यें येऊन दाखल झाला. या जथ्यांतच स्पिनोझाचे आजोबा व वडील होते. स्पिनोझाचें घराणें संपन्न अशा व्यापारी मंडळींचे होतें. स्पिनोझाचा जन्म अमस्टरडॅममध्यें नोव्हेंबर महिन्याच्या चोवीसाव्या तारखेस इ. स. १६३२ त झाला. वयाच्या सहाव्या वर्षी त्याची आई दिवंगत झाली. स्पिनोझाचें शिक्षण ज्यू विद्यालयांतच झालें. त्यास तेथें हिब्रू वाङ्मयाचा अभ्यास करावा लागल्यामुळें इब्न एझ्रा, मायमोनाइडस् सारख्या प्रसिद्ध चिकित्सक लेखकांच्या ग्रंथांचा परिचय झाला. त्यानें लॅटीन, स्पॅनिश, जर्मन, डच, पोर्तुगीज भाषा अवगत करून घेतल्या. फ्रेंच व इटालिअन भाषांचीहि थोडीफार ओळख करून घेतली. स्पिनोझाच्या शिक्षकांपैकीं मॅनॅसे बेन इस्राएल नांवाचा एक हुषार शिक्षक होता. पोर्तुगाल देशांत रोमन कॅथालिक धर्मगुरूंनीं चालू केलेल्या नास्तिकांच्या चौकशी-

मध्यें १५० ज्यूंना जिवंत जाळण्याचा हुकूम झाला होता. त्या दीडशेमध्यें या शिक्षकाचे वडील होते. परंतु कांहींतरी युक्ती योजून ते आपल्या कुटुंबासह निसटून अमस्टरडॅमला येऊन राहिले होते. स्पिनोझा बावीस वर्षांचा झाला तेव्हां त्याचे वडील वारले. वडिलांच्या मागे त्यांच्या संपत्तीचे वारस तो व त्याची सावत्र बहीण अशी दोघेंच राहिलीं होतीं. सर्व संपत्ति आपणांसच मिळावी अशी बहिणीनें कारवाई केली. तेव्हां केवळ न्यायपक्षासाठी स्पिनोझानें दावा मांडून तो जिंकला. परंतु नंतर निस्पृह बुद्धीनें ती सर्व संपत्ति केवळ वडिलांचा एक बिछाना आपणांकडे ठेवून घेऊन बहिणीचे हवालीं केली ! व स्वेच्छेनें गरीबी पतकरून पुढील आयुष्यांत स्वतःचे श्रमावर–दुर्बिणीच्या कांचा वगैरे तयार करून आपला उदरनिर्वाह केला.

धार्मिक बाबतींत स्पिनोझानें स्वतंत्र अभ्यास करून आपलीं मतें बनविलीं होतीं. बायबलमध्यें असलेल्या गोष्टी व विज्ञान आणि तर्क यावरून निघणारीं अनुमानें यांचा मेळ बसणें दूरापास्त आहे असें त्यास वाटूं लागलें व तीं मतें तो निःशंकपणें बोलून दाखवी. तत्कालीन सनातनी ज्यू मंडळींच्या कांनीं हीं मतें गेल्यावर त्यांना भय वाटलें. हीं मतें सोडून देण्याबद्दल त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न करण्यांत आला, त्यास मोठी रक्कमहि लांच म्हणून देण्याची तयारी दर्शविली गेली; परंतु स्पिनोझा या मोहास बळी पडला नाहीं. शेवटीं इ. स. १६५६च्या जुलै महिन्यांत त्यास ज्ञातिबहिष्कृत व्हावें लागलें. यावेळीं त्याचें वय २४ वर्षांचें होतें. स्पिनोझास ॲमस्टरडाम सोडावें लागलें. तो नजीकच्या एका खेड्यांत जाऊन राहिला. त्यानें आपल्या आयुष्याचें ध्येय तत्त्वचिंतन हेंच निश्चित केलें. निर्वाहासाठीं कोणाची याचना न करतां कांचा घासण्याच्या उद्योगावर उदरनिर्वाह करण्याचा त्यानें निश्चय केला. तत्त्वज्ञानाची आवड असणारें लहानसें मित्रमंडळ त्याच्या भोंवतीं गोळा झालें. त्यांपैकीं एकजणानें त्यास आपल्या संपत्तीपैकीं बरीच संपत्ति देऊं करून कांहीं न करतां सुखानें राहतां येईल अशी व्यवस्था करण्याचें मनोगत प्रगट केलें; परंतु स्पिनोझानें त्यास मान्यता दिली नाहीं. स्वतः श्रम करून मिळेल त्यांत भागवणें हेंच त्यास पसंत होतें. चार वर्षे तेथें राहून इ. स. १६६० मध्यें स्पिनोझा रिन्सबर्ग या दुसऱ्या खेड्यांत जाऊन राहिला. तेथील निवांत स्थानीं त्यानें बुद्धीची सुधारणा, देकार्तच्या तत्त्वज्ञानाचें विवरण, व नीतिशास्त्रावरील प्रसिद्ध ग्रंथांच्या सुरवातीचा कांहीं भाग यांचे लेखन केलें.

सतराव्या शतकांत युरोपांत प्रवास करणें, ग्रंथ प्रसिद्ध करणें या गोष्टी सोप्या नव्हत्या. ज्ञानाच्या प्रसारास साहाय्य करणाऱ्या संस्थाहि फारच थोड्या होत्या. या परिस्थितीमुळें जिज्ञासूंना विद्वान् व्यक्तींशी पत्रव्यवहार करण्यावर अवलंबून राहावें लागे. त्याप्रमाणें कांहीं व्यक्तींनीं आपल्या तात्त्विक शंकासमाधानासाठीं स्पिनोझाशी पत्रव्यवहार चालू केला. देकार्त अगर लायबीनिझ या तत्त्ववेत्त्यांच्या पत्रव्यवहाराच्या संख्येच्या मानानें स्पिनोझाचा पत्रव्यवहार थोडा आहे. पण तो महत्त्वाचा आहे. तो त्याचे पश्चात् प्रसिद्ध झाला असून त्याच्या विचारसरणींतील अनेक दुर्बोध स्थळांचें सुगमतेनें स्पष्टीकरण होण्यास मदत करणारा आहे.

सन १६७३ मध्यें स्पिनोझास हिडलबर्गच्या विश्वविद्यालयांतील तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकाची जागा देऊं करण्यांत आली. परंतु ती त्यानें नाकारली. आपलें विचारस्वातंत्र्य रतिमात्र कमी होऊं द्यावयाचें नाहीं, त्यास बाधक गोष्टी स्वीकारावयाच्या नाहींत या बाण्यानुरूपच ही गोष्ट घडली.

१६७६ च्या हिवाळ्यांत एक महत्त्वाचा प्रसंग घडला. तो म्हणजे लायबिनीझ या जर्मन तत्त्वज्ञान्याची व स्पिनोझाची झालेली भेट होय. दोघांचे स्वभाव अगदी भिन्न होते. लायबिनिझ हा अनेक





अनुक्रमणिका

कामांत स्वतःस गुंतविणारा, संघटणाकुशल, सत्तालोलुप, लोभी, राजकारणी, दरबारीं आवक जावक करणारा, चालतां बोलतां ज्ञानकोशच, अनेक विषयावर लेखन करणारा, न्यूटननंतर युरोपांत जन्मास आलेला त्याच्या तोलाचा बुद्धिमान् असा पुरुष होता. स्पिनोझाची वृत्ति त्याच्या अगदीं विरुद्ध होती. एकांतप्रियता, आत्मतृप्ति व जगाविषयीं उदासीनता या गोष्टी त्याच्या अंगीं असून तत्त्वचिंतनावरच त्यानें आपलें सर्व सामर्थ्य एकवटून बुद्धीस फाटे फुटू दिले नव्हते. एक सुसंगत तत्त्वसरणी तयार करून तिच्यांत गर्भित असणारी नैतिक मूल्यें व्यक्त करण्याचें ध्येयच त्यानें स्वीकारलें होतें. अशा या दोन प्रख्यात परंतु परस्परभिन्न स्वभावांच्या तत्त्वचिंतकांचे संवादहि तितकेच मोलाचे झाले असतील, परंतु दुर्दैवानें ते उपलब्ध नाहींत. खुद्द लायबिनीझनें त्याची वाच्यता केली नाहीं.

स्पिनोझाची प्रकृति मुळांत क्षयी होती. कांचा घासण्याच्या व्यवसायानें तिच्यावर अधिकच वाईट परिणाम झाला. पुढील वर्षींच म्हणजे सन १६७७ मध्यें फेब्रुवारीच्या २१ तारखेस त्यानें शांतपणें देह विसर्जन केला. त्यानें मागें ठेविलेली संपत्ति अगदींच थोडी होती– शंभरावर पुस्तकें, थोडीं कोरीव चित्रें, काचा घासण्याची हत्यारें व कांहीं काचा– पण यांच्याच जोडीस त्यानें आपल्या बैठ्या मेजाच्या कप्प्यांत ठेवलेली दौलत मात्र अमोल होती. ती म्हणजे त्याचे हस्तलिखित ग्रंथ व पत्रव्यवहार होय.

## देकार्त आणि स्पिनोझा

आधुनिक पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा जनक म्हणून फ्रेंच तत्त्वज्ञ देकार्त यांस मान दिला जातो. देकार्तनें मध्ययुगीन तत्त्वज्ञान्यांची शब्दप्रामाण्याची परंपरा झुगारून स्वतःच्या विवेकबुद्धीवर तत्त्वज्ञानाची इमारत उभारण्याचा यत्न केला. स्पिनोझाचें विचारसरणीवर देकार्तचा फार मोठा परिणाम झालेला आहे. स्पिनोझाहि शब्दप्रामाण्य मानीत नाहीं. त्याच्या मतें मानवी बुद्धीचा योग्य उपयोग केल्यास अंतिम सत्य हें अगम्य रहात नाहीं. स्पिनोझा संशयवादी नाहीं अगर अज्ञेयवादीहि नाहीं. त्यानें आपल्या बुद्धीच्या जोरावर अंतिम सत्याचा पद्धतशीर आराखडा तयार करून तो भूमितीच्या पद्धतीनें आपल्या "नीतिशास्त्र" या ग्रंथांत मांडला आहे. "I do not presume to have discovered the best philosophy but I Know that I understand the true one"–– (मी सर्वांत उत्तम तत्त्वज्ञानाचा शोध केला आहे असें मानीत नाहीं परंतु मला खरें तत्त्वज्ञान समजलें आहे हें मात्र मला माहीत आहे) असें त्यानें आत्मप्रत्ययाचे उद्गार काढले आहेत.

देकार्तच्या तत्त्वचिंतनाची प्रेरणा त्याच्या बौद्धिक संशयामध्यें होती. परंतु स्पिनोझाच्या तत्त्वज्ञानाचा उगम त्याच्या हृदयांत असलेल्या शाश्वत प्रेमविषयाच्या संशोधनाच्या तळमळींत आहे. "बुद्धीची सुधारणा" या निबंधांत स्पिनोझानें आपल्या संशोधनाचें सार सांगितलें आहे. हें स्पिनोझाचें तात्त्विक आत्मवृत्तच म्हणतां येईल.

## ऐहिक सुखें व शाश्वत सुख

जगाचा अनुभव घेत असतां स्पिनोझास असें आढळून आलें कीं आयुष्याची चालू राहणी व सर्वसामान्य जीवनक्रमाची योजना यांत बदल केल्याखेरीज शाश्वत सुखाचा मार्ग सांपडणें कठीण आहे. जगांत सामान्य मनुष्य तीन गोष्टींना महत्त्व देतो. संपत्ति, कीर्ति व विषयसुख. या तिन्हींत मनुष्याचें मन एवढें गर्क झालेलें असतें कीं याहून श्रेयस्कर गोष्टी आहेत काय याचा विचार करण्याची शक्तीहि त्याचे ठिकाणीं उरलेली नसते. विषयसुखांत रमलेला मनुष्य त्या आनंदानें बेहोष होतो; पण ते सुख संपताच तो उदासीन बनून त्यांचें मन कमकुवत बनतें. संपत्ति आणि कीर्ति याहि मोठ्या आकर्षक गोष्टी आहेत. या दोन्ही प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न यशस्वी झाल्यास

मनुष्य अधिक उत्साहानें त्या अधिक मिळविण्याची खटपट करतो. उलट अपयश आल्यास त्याच्या वांट्यास दु:खाची रास येते. कीर्तिसंपादन करण्यांत आणखी असा एक दोष असतो कीं तिच्या मागें लागलेल्या मनुष्यास आपलें जीवन इतरांच्या मताप्रमाणें बनवावें लागतें. सामान्य माणसें ज्या गोष्टी मानतात तें त्यास स्वीकारावें लागतें व सामान्यांना न रुचणाऱ्या गोष्टी त्यास चांगल्या असल्या तरी टाकाव्या लागतात. यामुळें त्याची कीर्ति वाढली तरी मानसिक अधोगति होत असते. या परिस्थितींत या तिन्ही गोष्टींचा त्याग केला पाहिजे काय ? स्पिनोझा सांगतो कीं यांचा त्याग करण्याची आवश्यकता नाहीं. मानवी जीवनांतील त्यांचे स्थान ओळखलें पाहिजे. त्यांना अंतिम साध्य मानणें चूक आहे. परंतु साधनें या दृष्टीनें त्याची किंमत करणें गैर नाहीं. स्पिनोझा हा केवळ संन्यस्तवृत्तीचा पुरस्कर्ता नाहीं. जीवनांतील सुखांची रुचि संयमशीलतेनें चाखल्यास जीवनांत ताजेतवानेपणा निर्माण होतो व असा ताजेपणा निर्माण करणें हा सूज्ञतेचाच भाग होय असें त्याचें मत होतें. तो म्हणतो– "It is the part of a wise man, I say, to refresh and invigorate himself with moderate and pleasant eating and drinking, with sweet scents and the beauty of green plants, with ornament, with music with sports and with the theatre." जोपर्यंत संपत्ति, कीर्ति व जगांतील सुखें हीं जीवनांतील साध्यें म्हणून मानलीं जातात तोंपर्यंतच तीं मनुष्याच्या शाश्वतसुखप्राप्तीच्या मार्गांत अडथळे उत्पन्न करतात; परंतु संयमशीलता राखून तीं केवळ साधनें आहेत हें ध्यानीं आणल्यास तीं सर्व इष्ट साध्यास पोषकच ठरतात.

### सौख्यदायक वस्तूचें ज्ञान अवश्य : ज्ञानाचे तीन प्रकार–

मनुष्यास जें सुखसमाधान मिळतें त्याचा दर्जा ज्या वस्तूपांसून त्यास तें मिळतें त्यावर अवलंबून असतो. ती वस्तू अनंत, अपार असली तर सुख-समाधानहि त्याच तऱ्हेचें मिळतें. अविनाश वस्तूवर मनुष्य प्रेम करील तर त्यास त्या वस्तूकडून सुखाचा अखंड झराच त्याच्या जीवनाकडे वाहू लागेल. परंतु ज्यावर प्रेम करावयाचें तिचें ज्ञान अगोदर व्हावयास हवें. याकरितां स्पिनोझानें ज्ञानाची चिकित्सा केली आहे. त्याच्या मतें ज्ञानाचें तीन प्रकार असून ते एकाहून एक वरिष्ठ आहेत. ज्ञानाचें हे तीन प्रकार म्हणजे एकाहून एक वरचढ अशा तीन पायऱ्याच होत. स्पिनोझानें या तिन्हींस कल्पना, प्रज्ञा व प्रतिभा (Imagination, Reason and Intuition) अशीं तीन नांवें योजिलीं आहेत. पहिल्या प्रतीचें ज्ञान हें सदोष व अपुरें असतें. इंद्रियगोचर असें भिन्न भिन्न पदार्थ तें वैयक्तिक दृष्टिकोनांतून पाहातें. दुसऱ्या प्रतीच्या ज्ञानांत हे भिन्न पदार्थ भिन्न नसून त्यांमध्यें कांहीं एक सुव्यवस्था आहे हें बुद्धीच्या चक्षूनें दिसत असतें. तिसऱ्या व श्रेष्ठ ज्ञानांत सर्वांच्या मूलतत्त्वावर दृष्टि जाऊन संपूर्ण सत्याचा साक्षात्कार होतो. दुसऱ्या प्रकारच्या ज्ञानाचा परिपाक म्हणजेच हें तिसरें ज्ञान होय. प्रतिभा ही भिन्न शक्ती नसून प्रज्ञेचेंच परिणत स्वरूप होय. स्वत:सिद्ध व स्वयंपूर्ण अशा संपूर्ण सत्याचें ज्ञान म्हणजे हें परिणत ज्ञान होय.

स्पिनोझाच्या परिणत प्रज्ञेचें फल म्हणजे त्याचे Ethics (नीतिशास्त्र) होय. ग्रंथाच्या नांवावरून तो केवळ नीतिशास्त्रविषयक ग्रंथ असावा असें वाटतें; परंतु तो तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ असून त्याचा शेवट श्रेष्ठ समाधान हें श्रेष्ठ तत्त्वज्ञानावर कसें अधिष्ठित आहे हें दाखविण्यांत झाला आहे व त्यामुळें त्यास वरील नांव दिलेलें आहे.

### स्पिनोझाची आध्यात्मिक विचार-प्रणालि

देकार्तनें आपल्या तत्त्वज्ञानाची सुरवात 'मी'च्या संशयरहित अस्तित्वापासून केली. सगळ्यांबद्दल संशय घेतां येईल पण संशय घेणाऱ्याबद्दल घेतां येत

नाहीं. संशय घेणारा मी हा निःसंशयपणें अस्तित्वांत आहे. या 'मी' ला अगर ज्ञात्याला दिसणारें जगाची सिद्धि करण्याकरतां मात्र त्यानें ईश्वराच्या प्रामाणिकपणाची मदत घेतली. वास्तविक ज्ञाता म्हटला कीं, ज्ञेय जगत् आलेंच. ही जोडी अविभाज्य आहे. त्यास बाहेरचा परमेश्वर आणावयास नको. स्पिनोझानें आपल्या तत्त्वचिंतनाची सुरवात संपूर्ण अस्तित्वापासूनच केली आहे. या संपूर्ण सत्यासच तो वस्तु अगर ईश्वर म्हणतो. जिचें अस्तित्व दुसऱ्या कशावर अवलंबून नाहीं ती वस्तु होय अशी वस्तूची व्याख्या देकार्तनें केली होती. तीच स्पिनोझानें स्वीकारली आहे. देकार्तनें ईश्वर, जड, चेतन अशा तीन वस्तु मानल्या. स्पिनोझानें अनेक वस्तु मानणें विसंगत आहे, कारण जिचें अस्तित्व स्वतःवर अवलंबून आहे अशी वस्तु एकच असूं शकतें हें दाखवून दिलें. वस्तूच्या वर दिलेल्या व्याख्येपासूनच तीन गोष्टी सिद्ध होतात. (१) वस्तूच स्वतःचें कारण आहे. ती दुसऱ्या पासून उत्पन्न झाली असें म्हटल्यास तिला वस्तूच म्हणता येणार नाहीं. (२) ती अनंत आहे. ती मर्यादित आहे असें म्हटल्यास ती दुसऱ्या वस्तूंनीं मर्यादित होऊन त्यांचेवर अवलंबून आहे असें म्हणावें लागेल. (३) वस्तू एकच आहे. दोन आहे म्हटल्यास त्या एकमेकांस मर्यादित करतील आणि त्यांचें स्वातंत्र्य नष्ट होईल—त्यांचें वस्तुत्वच नाहीसें होईल.

याप्रमाणें वस्तु अगर अंतिम पदार्थ एक असून तो अनंत आहे. ईश्वर हा अनंत आहे. अनंत वस्तू दोन असूं शकत नाहींत. तेव्हां ही वस्तु म्हणजेच ईश्वर. स्पिनोझाची ईश्वरविषयक कल्पना परंपरागत खिस्ती धर्मांतील कल्पनेहून भिन्न होती. विश्व म्हणजेच परमेश्वर, असें त्याचें समीकरण आहे. विश्व ही त्याहून भिन्न अशा ईश्वराची निर्मिती असें तो मानीत नाहीं. विश्व व ईश्वर यांचा विचारानें वेगळेपणा करितां येईल व दोहींत कार्यकारणभाव मानतां येईल. पण तो भौतिकपद्धतीचा नसून तार्किक अनुमान पद्धतीचा आहे. त्रिकोणाच्या तीन कोनांची बेरीज दोन काटकोन असते हें जसें त्रिकोणाच्या मूळ स्वरूपावरूनच न्यायतः प्राप्त होतें त्याप्रमाणें मर्यादित व विविध विश्व ईश्वराच्या स्वरूपावरूनच न्यायतः प्राप्त होतें. ईश्वराचें अगर वस्तूचें गुणधर्म अनंत आहेत पण मानवी बुद्धीस त्यांतील फक्त दोनच गम्य आहे. ते म्हणजे विचार व अवकाशव्यापकता अगर चेतन व जड हे होत. हे दोन्ही भिन्न नसून एकच होत. जगांतील सर्व चेतन अचेतन वर्ग या दोन्हींचे प्रकार होत. विचार, इच्छा इत्यादि मानुषधर्म ईश्वरास लावणें चुकीचे आहे. Dog व God या दोहींत अक्षर-साम्य असलें तरी अर्थांत महान् अंतर आहे, त्याप्रमाणें मानवी इच्छा व विचार ईश्वरावर लादण्याची अवस्था व ईश्वराची खरी अवस्था यांत आहे.

या तात्विक बैठकीवरूनच स्पिनोझानें मानवी मनाच्या स्वरूपाचा व मानवी जीवनाच्या नैतिक साफल्याचा विचार केला आहे. मानवी मनाचें खरें स्वरूप म्हणजे तें ज्याच्या चेतनधर्माचा प्रकार आहे तें ईश्वरतत्त्वच होय. मनांतील वासनांच्या आहारीं जाऊन मनुष्य हा आशा, तृष्णा, पिपासांना बळी पडतो. पण या वासनेच्या मूळ रूपाचें म्हणजे वासना ज्याच्या त्या मनाच्या, मूळ रूपाचें म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें ईश्वरतत्वाचें ज्ञान झाल्यानें मनुष्यास वासनावर विजय मिळविण्याचें सामर्थ्य प्राप्त होतें. सॉक्रेटीसप्रमाणें स्पिनोझा हाहि ज्ञान म्हणजेच सद्गुण मानतो. त्यामुळें ज्ञानविकासाबरोबरच मानवाचा गुणविकास अगर नैतिक उन्नति होते असें त्याचें म्हणणें आहे.

कल्पना, प्रज्ञा व प्रतिभा या ज्ञानाच्या तीन अवस्था मागें वर्णिल्या आहेत. त्यांतील तिसरी अवस्था सर्वश्रेष्ठ होय. या अवस्थेंत जगांत ईश्वर व ईश्वरांत जग दिसतें. या श्रेष्ठ ज्ञानांतूनच ईश्वरविषयक प्रेम निर्माण होतें. ही अवस्था म्हणजेच मानवाच्या

ज्ञानाची व नैतिक विकासाची परमावस्था होय. हेंच मानवाचें खरें अमरत्व होय. अशा रीतीनें स्पिनोझाच्या अध्यात्माचा शेवट या अमरपदप्राप्तींत होतो.

बर्ट्रांड रसेलनें स्पिनोझाबद्दल लिहितांना म्हटलें आहे कीं, सर्व थोर तत्त्वज्ञांत स्पिनोझा हा अत्यंत उदार व अत्यंत गोड असा तत्त्वज्ञ आहे. त्याच्या विचारसरणींतील कांहीं गोष्टी तर्कास पटल्या नाहींत तरी ज्यावेळीं तुमच्यावर जगांत वागतांना मोठा घाल्याचा प्रसंग येईल त्यावेळीं वैयक्तिक दुःखप्रसंगाहून कितीतरी थोर गोष्टी विश्वांत आहेत त्याकडे तो तुमचें लक्ष वेधील. दुःख व यातनांनीं भरलेलें मानवी जीवन असलें तरी तें विशाल विश्वाचा केवळ एक कण आहे हें सांगून तो तुम्हांस सूज्ञता शिकवील व भयाण नैराश्याच्या बधिरतेंतून मुक्त होण्याची संजीवनी हातीं देईल.

---





अनुक्रमणिका

## पुस्तक-परामर्श –

**जय-मंगला :** ले. कवि यशवंत, अनुवादक श्री. भि. वेलणकर, प्रका० राजकवि यशवंत सत्कार समिति, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई २.

भावबंधन नाटकांत बायको मिळविण्यासाठीं जी अनेक अचाटकृत्यें करावीं लागतील असें घनश्यामानें महेश्वराला सांगितलें त्यांत 'फार काय, आधुनिक नाटककारांप्रमाणें भाषांतरहि करावें लागेल' असें एक वाक्य आहे. गडकऱ्यांच्यापुढें एक पाऊल जाऊन टी. एस्. एलियट या प्रथितयश आंग्ल टीकाकारानें असें म्हटलें आहे कीं, 'काव्याचें भाषांतर करणें अशक्यप्राय आहे.' हें विधान करण्या-मागील एलियटची भूमिका कदाचित अशी असेल कीं, परभाषेंत विचार करणें कठीण नाहीं, पण मातृभाषेव्यतिरिक्त अन्यभाषेंत भाव व्यक्त करणें मात्र दुष्कर आहे. भावाविष्कार करणें हा अभिजात काव्याचा प्राण आहे. आणि म्हणूनच काव्याचें भाषांतर करणें अवघड असावें. काव्याचा अनुवाद करण्यांतील ह्या मूलभूत अडचणीवर जयमंगला ह्या हृदयंगम भावकाव्याचा संस्कृत अनुवाद करून श्री. वेलणकरांनीं मात केली आहे.

जयमंगला हें राजकवि यशवंताचें खंडकाव्य रविकिरण मंडळाचेंद्वारां १९३१ मध्यें प्रकाशित झालें. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचेवतीनें राजकवि यशवन्त-सत्कार-समितीनें जयमंगलेचा श्री. वेलणकर यांनीं केलेला संस्कृत अनुवाद कविराजांचे एकसष्टी समारंभाचें सुप्रसंगीं मार्च १९५९ मध्यें प्रसिद्ध केला आहे.

मराठी वाचकांना यशवन्तकवींची ओळख करून देण्याची आवश्यकता नाहीं. ते कांहीं नांवाचेंच 'यशवन्त' नाहींत ! पण श्री. वेलणकरांचा मात्र मराठी वाचकांना परिचय करून देणें आवश्यक आहे. पांडित्य व कवित्व यांचा अन्योन्यसंबंध लक्ष्मी-सरस्वतीच्या नात्याइतकाच निकटचा समजला जातो (!) श्री. वेलणकर मात्र याला अपवाद आहेत. ते विद्वान संस्कृत पंडित असून कवीहि आहेत. संस्कृत, मराठी, इंग्रजी वगैरे अनेक भाषांवर त्यांचें प्रभुत्व आहे. ते स्वतः संगीतज्ञहि आहेत. मध्यवर्ती सरकारांत ते बडे ऑफिसर आहेत. संस्कृत काव्य रचणें हा श्री. वेलणकरांचा आगळा छंद आहे. नोकरीच्या प्रसंगानें त्यांना अनेकवेळां भारताचे अक्षांश रेखांशांतून भ्रमण करावें लागते. हा अनुवाद म्हणजे प्रवासांतील मिळणारी फुरसत व आगगाडीचा तालबद्ध ठेका यांचा परिपाक आहे. यशवन्तांच्या बहुतेक कवितांची निर्मितीहि प्रवासांत झालेली आहे असा निर्वाळा श्री. वेलणकरांनीं त्यांच्या 'अनुवादाच्या मुळांत' दिलेला आहे. तेव्हां हा प्रवास-प्रसूतियोग खरोखरच अपूर्व होय !

'तुजकडे पाहतो पुन्हां पुन्हां हा काय गडे माझाच गुन्हा' या जयमंगलेंतील भावमधुर गीताचा संस्कृत श्री. वेलणकरकृत अनुवाद 'अपराद्धं नाम मया ह्या शीर्षकाखालीं कांहीं वर्षांपूर्वीं 'रागिणी' मासिकांत प्रसिद्ध झाला होता.

जयमंगला हें एक प्रेमकाव्य आहे. काव्याची कथावस्तु सरळ, सुटसुटीत आहे. या प्रेमकथेचा नायक हा एक फिरस्ता आहे. तो विद्वान आहे, पण त्याच्या जिण्यांत एकप्रकाराची अनामिक शून्यता भरली आहे. आर्नोल्डच्या स्कॉलरजिप्सी प्रमाणें 'दैवी असंतुष्टतेनें' ( Divine discontents ) तो भारला आहे. 'श्रांत माथा टेकविण्यासाठीं' त्याला जी 'मदाकाङ्क्षा स्वभूषा मानिते' अशी 'ध्येय-संवादी सखी' हवी असते. कितीक प्रांत धुंडिता धुंडिता या काव्यात्म पिशाला एक राजबाळी शिष्या लाभते. ही नृपकन्या आपल्या बुद्धिवैभवानें त्या मुशाफिरगुरूला दिपवून टाकते. त्यांचा बहुतेक वेळ एकमेकांकडे पाहाण्यांत जातो. आणि वर नायक 'हा काय गडे माझाच गुन्हां' असें त्या राजेन्द्र-बालेला विचारतो. अखेर हा लपंडाव राजाच्या लक्षांत येऊन तो नायकाला पकडून आणतो. गुरुजी 'सांग तू सजा खुशाल कोणतीहि भूपते' असें बेडर आव्हान देतात. देहान्ताची शिक्षा फर्माविली जाते. नायक प्रीति-हुतात्म्याच्या निष्ठेनें वधस्तंभापाशीं जातो, पण अंतिम क्षणीं राजकन्या घोडाफेकींत वायुवेगानें तेथें येते व प्रेमिकांचें मिलन होऊन अखेर 'आनंदी आनंद गडे' होतें.

ह्या प्रेमकथेचें उद्यान बावीस भावपुष्पांनीं बहरलें आहे. प्रत्येक कवन प्रणयीं युवकाचे आत्मगत वा प्रगट उद्गार आहेत. प्रत्येक कवन स्वतंत्रपणें वाचलें तर तें एक स्वयंपूर्ण भावगीत आहे. सुबक कलापूर्ण चित्रांचा जणूं कांहीं ह्या एक सुंदर अल्बमच आहे. उत्तरराम-

चरिताचें पहिल्या अंकांत भवभूतीनें चित्रदर्शन घडवून पूर्वरामचरित सांगितलें त्याची आठवण हें चित्रदर्शन रसिकास करून देईल. उत्तररामांत चित्रमय काव्यदर्शन आहे, तर जयमंगलेंत काव्यमय चित्रदर्शन घडविलें आहे.

विविधतेंतील एकता हें जयमंगलेचें खास स्वरूप श्री. वेलणकरांनीं आपल्या अनुवादांत मुळांतील रचना-प्रबंध व वृत्तें वापरून कायम राखलें आहे.

प्रासादिक शब्दयोजना, ललितभावनांचा आविष्कार व संगीतप्रधानता हीं जयमंगलेचीं कलात्मक वैशिष्ट्यें होत. मुळांतील हे सर्व काव्यगुण संस्कृत अनुवादांत प्रकर्षानें आढळतात. प्रसादपूर्ण रचना ' भवान् शासनं करोतु । ' किंवा ' सेवकोऽहम् । ' अथवा ' मृत्युपथे । ' या गीतांत सांपडते. यशवंतांच्या भावभराच्या सर्व ठिकाणींच आढळतात. पण ' आकर्षणम् '-च्या अखेरच्या ओळींत मात्र अनुवादकारांनीं कवीवरहि मात केली आहे. ती ओळ अशी : "ह्न्मत्स्यः स्नेहजलार्थी भवद्दर्शनेन । ." मुळांतील पंक्ति केवळ ' ओढणी जिवाला लागे तुझ्या दर्शनानें ' अशी आहे. तसेंच मराठींतील नादमाधुर्य व गेयता ही ' अपराद्धं नात्र मया । ' किंवा ' तव विरहे । ' या संस्कृत रूपांतरांत आढळतात.

मुळांतील मराठी भावगीत जर संस्कृत कवनांत समोर छापलें असतें तर या पुस्तकाच्या उपयुक्ततेंत भर पडून रसिकांना अधिक चांगला आस्वाद घेतां आला असता असें आम्हांस वाटतें. त्याचप्रमाणें 'वनविहारः' या गीतांतील बाणसदृश गौडी-समासप्रचुर रचना जरा अधिक सुटसुटीत असती तर बरें झालें असतें.

एकंदरींत पाहतां श्री. वेलणकरांनीं मूळ मराठी बरहुकूम यशवंतांच्या जयमंगलेला मनोज्ञ संस्कृत वेषभूषा चढविली आहे. ज्यांना मराठी येत नाहीं अशा रसिकांना मराठींतील एक अभिजात काव्य श्री. वेलणकरांनीं संस्कृत भाषेंत उपलब्ध करून दिलें आहे. घटनेच्या चौदा भाषेंत संस्कृताचा समावेश आहेच. भाषा-भगिनींच्या परस्परसाहित्याचा हा परिचय फारच उत्तम रीतीनें करून दिला गेला आहे.

अशा रीतीनें स्वतःच्या अंगचें काव्य-कर्तृत्व, मराठी व संस्कृत भाषांवरील हुकमत व संगीताचें ज्ञान या त्रिगुणांचे जोरावर श्री. वेलणकरांनीं जयमंगलेचें संस्कृत भाषांतर करून काव्याचें भाषांतर करण्यांतील प्रमुख अंतरायावर विजय मिळविला आहे.

यापुढेंहि श्री. वेलणकरांनीं हें अनुवादाचें काम पुढें चालवावें. श्री. केशवसुत, गडकरी, तांबे, बालकवि वगैरे थोर कवींच्या कांहीं वेचक उत्कृष्ट भावगीतांचा संस्कृत अनुवाद जर श्री. वेलणकरांनीं करून प्रसिद्ध केला तर मराठी भाषेवर उपकार होतीलच व अन्यभाषिक रसिकांवरहि.

—श्री. हरिहर उर्सेकर



अनुक्रमणिका

# 'नवभारत': वर्ष बारावें — लेख-सूचि

## आक्टोबर १९५८ ते सप्टेंबर १९५९

## लेख – सूचि आक्टोबर १९५८ ते सप्टेंबर १९५९

अनुक्रमणिका

## लेख – सूचि आक्टोबर १९५८ ते सप्टेंबर १९५९



### पुस्तकपरामर्श, ग्रंथपरिचय

अनुक्रमणिका

# नवभारत : वर्ष बारावें — लेखक-सूचि

## आक्टोबर १९५८ ते सप्टेंबर १९५९

[ पहिला आंकडा अंकाचा अनुक्रम; दुसरा आंकडा पानांचा ]

# सहकारी शेती म्हणजे

# फायदेशीर शेती

पंजाबांत कर्नाल जिल्ह्यांतील झिंझारी या खेड्याच्या शेतकऱ्यांनीं सहकार्याच्या मार्गानें शेतींत सुधारणा केल्यामुळें त्यांची भरभराट झाली. आपापल्या जमीनींची नांगरणी व मशागत करण्यासाठीं सात शेतकरी एकत्र आले. नंतर आणखीही कांहीं शेतकरी खुषीनें त्यांच्यांत सामील झाले. शेतीच्या कामांत एकमेकांना सहकार्य देण्याचें ठरवून त्यांनीं 'सहकारी शेती संघ' स्थापन केला. सर्वांच्या शक्ति एकत्र आल्यामुळें संघाला ट्रॅक्टर विकत घेतां आला; उत्तम बियाणें पैदा करतां आलें; जास्त रासायनिक खत वापरतां आलें व शेतीच्या सुधारलेल्या पद्धतींचाही अवलंब करतां आला. परिणाम :— दर एकरास १५ मण होणारें गव्हाचें पीक एकदम १८ मण निघालें ! या जास्त पिकामुळें जास्त पैसा मिळाला आणि त्या सहकारी शेती संघाला अल्पावधींत कर्ज फेडही करतां आली. सहकारी शेतीचा अधिकाधिक अवलंब करा. त्यामुळें तुमचा फायदा व देशाची प्रगति होते.

# योजनेस सहाय्य म्हणजे स्वतःस सहाय्य




अनुक्रमणिका